


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिध्द केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

# दीपावली



साहित्य • कला • संगम

**ऑगस्ट १९६३ : वर्ष १९ वें**

## श्रेयनामावलि–

*कथा :*

- **एक एकटी**–अरविंद गोखले • **पृथ्वी**–इन्दू साक्रीकर • **दर्भांचा कावळा**–वसंत फेणे.
- **निश्चय**–वसंत गांगल.

*एक व्यंग कृति :*

- **चित्रपत्रें**–एका व्यंगचित्रकाराचें स्वप्नरंजीत पत्र रेखाटन.

*चालू कादंबरी :*

- **भीष्माचा डोंगर**–श्रीराम कामत लिखित कादंबरीचा पुढील भाग.

*ललित व विनोदी लेख :*

- **गीतेच्या मुख्यार्थाची कैफियत**–अशोक अकलूजकर • **धर्म प्रसंग**–मधुकर केचे
- **नवें प्रातःस्मरण**–चंद्रकांत इंदापूरकर • **अखेर काळानें मात केली**–प्रभाकर चेंदवणकर

*कविता :*

- **बढे चलो चव्हाण**–राजा बढे

*सदरें :*

- **ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन**–प्रेमानंद वळवईकर, श्रीपाद भागवत.
- **दीपमाला** • जय नांवाचा इतिहासावरील वाचकांची प्रतिक्रिया.

याशिवाय हास्यचित्रें, त्रिंगचित्रें, व्यंगचित्रें, पानपूरकें वगैरे.

टे. नं. ७७७६५

Gram : DALALART

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींही अधिकृत मतें असतातच असें नाहीं.* प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.




**दलाल आर्ट स्टूडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोन: ७७७६५  तारेचा पत्ता : DALALART

● वर्गणीदारांस सूचना : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु.१२–५०न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००

● वर्गणी मनिऑर्डरनें पाठवावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● अंक न पोचल्याचें कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठ वला जाईल.

● जाहिरातींचा व्यवहार हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येतें. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● साहित्याच्या स्वीकृतीचा निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● स्वीकृत अगर इतर साहित्य गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# जिथें भय नाहीं तिथें जय ठेवलेलाच!

**तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्यच, मय्यैर्पित मनोबुद्धिर्मामेवैष्यस्य संशयम् ॥**

हे भारता, अंतिम विजयाबाबत संशय घेण्याची मुळींच जरूर नाहीं. विजय तुझा आणि तुझाच होणार आहे. ध्येयावर एकाग्र दृष्टी ठेवून जो यशासाठीं परिस्थितीशीं संग्राम करतो त्याला यश प्राप्त होतेंच होतें. निरपवाद यशाचें आश्वासन तुला देतांना भगवंतांनीं कर्तव्य म्हणून फक्त दोनच गोष्टी तुमच्यासमोर ठेवल्या आहेत. एक म्हणजे 'माझें स्मरण ठेव' आणि दुसरी म्हणजे 'युद्ध कर.'

भारता भगवंत तुला ज्या 'माझें' स्मरण ठेवावयास सांगतात तो हा मी कोण? भगवंताचा उपदेश काहीं कौरव–पांडव युद्धांसाठींच केवळ अर्जुनाला केलेला असा एकदेशीय उपदेश नव्हे. हा उपदेश चिरंतन आहे. सार्वकालिक आहे. यांतील माम् या पदाचा अर्थ श्रद्धेचा आधार असें ध्येय असाच घ्यावयास हवा. श्रीकृष्णाला या ठिकाणीं विराटरूपांतच पहावयास हवें. विश्वव्यापी तत्त्वाला अंड्याचें आवरण घालाण्याचा प्रयत्न करतां कामा नये.

हे यशवंता, शरीराच्या सामर्थ्यापेक्षां मनाचें सामर्थ्य अधिक मोलाचें असतें. मनाचें सामर्थ्य श्रद्धेच्या कुशींतून स्फूरत असते. जगांत आश्चर्यें घडतात तीं शरीराच्या सामर्थ्यानें नव्हे तर मनाच्या सामर्थ्यानें. जो कडा पाहून सहस्र हत्तींचें बळ असणाऱ्याच्या डोळ्यांपुढें अंधारी यावी त्या कड्यावरून केवळ मनाच्या बळामुळेंच हिरकणीनें निःशंक उडी मारली. शत्रूच्या सेनेचे लोंढ्यांवर लोंढे या बळामुळेंच बाजी प्रभूनें आपल्या छातीवर तोलून धरलें. या बळामुळेंच राजाराम महाराजांनीं केवळ साडेतीन निष्ठावान सेवकांच्या आधाराणावर, अवरंग्याच्या लक्षावधी सेनेपुढें शिवप्रभूंच्या दौलतीचें लेणें सांभाळलें. वज्राचें बळ असलेली हीं रत्नाच्या मोलाचीं मनें कां खचूं शकली नसती? त्यांच्या पुढचे संकटाचे डोंगर कांहीं सामान्य नव्हतें. पण हीं मनें खचलीं नाहींत. त्यांनीं संकटांना खचविलें. त्याला कारण काय झालें हें कां भारता तुला सांगावयास हवें?

शारीरिक बळाला ध्येयाचें पाठबळ असलें; अंतरीचें अधिष्ठान असलें म्हणजे तृणाचेंही वज्र बनतें. वेद म्हणतो,

नि येन मुष्टिहत्यया नि वृत्रा रुणधामहै ॥
त्वाऊतासो निअर्वता ॥ इंद्र त्वोतास आ वयं
वज्रं दहीमही ॥ जयेम सं युधि स्पृधः ॥
ऋग्वेद ॥ १–८ । २–३

अंतरीचे अधिष्ठान साह्यभूत असलें कीं नुसत्या मुष्टिप्रहारानें सुद्धां महान शत्रूचा नायनाट करतां येतो; हातांत साधा घण घेतला तरी त्याचें वज्र बनतें आणि शत्रूंचा क्षणांत विध्वंस होतो.

वेदकालाआधींपासून असाच न्याय चालत आला आहे. वेदकालीं असाच न्याय होता. आजही असाच आहे. पुढेंही असाच रहाणार आहे. आणि भगवंतांनीं याचाच अनुवाद करून तुला आदेश दिला आहे कीं 'उठ. माझें स्मरण ठेव आणि युद्ध कर. विजय हा ठरलेला आहे.'

भारता, तुझ्या शरीरसामर्थ्याची शंका तुझा शत्रूही घेणार नाहीं. तुझ्या मनोबळाची शंका तरी कोण करंटा घेऊं शकेल? 'माम् अनुस्मर' असें म्हणणाऱ्या भगवंताचें विराट रूप आज तुझ्या देशाच्या अवतारांत तुझ्यापुढें आहे. युगांयुगांतून श्रद्धास्थानें बदललीं तरी श्रद्धेचें सामर्थ्य हें चिरंतनच असतें. असे कालखंड येऊन गेलें कीं 'माम्' असें म्हणतांच देवाचें स्मरण व्हावें; धर्माचें स्मरण व्हावें. आज देश हाच देव आहे. देश हाच धर्म आहे. लोकशाही ही आज श्रद्धा आहे. मानवता ही आज संरक्ष्य आहे.

भारता, आज प्रत्येक पाऊल उचलतांना तुला लोकशाहीचेंच स्मरण हवें. प्रत्येक श्वास








घेतांना तुझी छाती लोकशाहीच्या स्मृतीनें कोंडावयास हवी. नेत्र उघडले कीं तुला लोकशाही दिसावयास हवी. नेत्र मिटले कीं तुला स्वप्न पडावयास हवें तेंहि लोकशाहीचेंच. अशा तऱ्हेनें तुझें जीवन लोकशाहीवरील श्रद्धेच्या बळानें भारून गेलें कीं तूं जें जें पाऊल टाकशील तें तें तुला यशाकडेच नेणारें ठरेल यांत शंका नाहीं.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

अगा ऐसया जरी जाहालिया। मग न मरिजे देह गेलिया॥ मा संग्रामु केलिया॥ भय काय तुज ?॥ ज्ञा. ८। ७८

आणि जिथें भय नाहीं तिथें जय ठेवलेलाच.

—उषाकान्त

## संपादकीय खुलासा

दीपावलीच्या जुलै ६३ अंकांत श्री. सुभाष भेंडे यांची 'दुबळा' कथा आम्ही प्रसिद्ध केली. हीच कथा 'सुदर्शन'च्या जून अंकांत येऊन गेल्याचे दीपावलीच्या वाचकांनीं आमच्या लक्षांत आणून दिलें. आम्हाला आश्चर्याचा धक्काच बसला. वाचकांच्या या जागरूकतेला व चिकित्सक वृत्तिला उत्तर देणं आवश्यक आहे. म्हणून आम्ही प्रत्यक्ष लेखकाकडूनच खुलासा मागविला आहे. लेखकाचा हा बोलका खुलासा खाली देत आहोत. तो वाचून वाचकांचे समाधान होईल अशीं अपेक्षा आहे.

—संपादक




सा. न. वि. वि.

आपलं पत्र कालच पोंचलं. वाचून मी बराच वेळ बुचकळ्यांत पडलों मी 'सुदर्शन'चा जून महिन्याचा अंक पाहिलेला नाहीं. गोव्यांत सुदर्शन फारसा येत नाहीं. मी तर प्रत्यक्ष 'सुदर्शन'ला कथा केव्हांहि पाठविलेली नाहीं. आजवर मी 'हंस', 'मोहिनी', 'दीपावली' 'किर्लोस्कर' या मासिकांनाच साहित्य पाठवीत आलों आहे.

स्मृतीला ताण दिला तेव्हां, एक गोष्ट आठवली. गेल्या वर्षी 'शब्दरंजन' शब्दकोड्यानें लघुकथा स्पर्धा लावली होती. साधारणता, एप्रिल १९६२ च्या सुमारास. कथा 'सुदर्शन' मासिकाच्या पत्त्यावर पाठवावयाच्या होत्या. या स्पर्धेचा निर्णय मी पुण्याला असेपर्यंत (म्हणजे १९६२ च्या जूनपर्यंत) लागला नव्हता. नंतर तो लागल्या व कांहींना पारितोषिकें मिळल्याचें माझ्या मित्रांनीहि सांगितलें ही गोष्ट मागच्या वर्षांची.

निकाल लागल्याचें कळल्यानंतर व त्यांत माझ्या कथेचा क्रमांक लागलेला नाहीं हें निश्चित झाल्यानंतर मी ती कथा 'दुबळा' आपल्याकडे पाटविली. साधारणतः डिसेंबर १९६२ मध्यें ती आपण पसंत केल्याचें पत्र आलें. श्री. गोपाळकृष्ण भोबे यांनी 'गोमंतक साहित्य संमेलन'च्या वेळीं समक्षही सांगितलें. त्यानंतर ही कथा जुलैच्या 'दीपावली'त आली.

दरम्यान मला न विचारतां अगर न कळवितां सुदर्शनेनें ही कथा आपल्या मासिकांत प्रसिद्ध केल्याचें दिसतें. त्यांनीं मला प्रथम तसें कळविलें असतें तर आपल्याकडे पुन्हां तीं कथा पाठविलीच नसती. पण तसें त्यांनीं केलें नाहीं. मजकूर कमी पडला म्हणून 'शब्दरंजन' स्पर्धेतील राहिलेल्या कथा वापराव्यांत असें त्यांनीं परस्पर ठरविलेलें दिसतें! जूनपर्यंत तरी मला जर त्यांचें पत्र आलें असतें तर मी तात्बडतोब त्यांना 'प्रसिद्ध करूं नका, "दीपावली'नें घेतली आहे" असें कळविलें असतें. आजवर मला त्यांच्याकडून अंकही नाहीं, कात्रणें नाहींत अगर मोबदला नाहीं! मागल्या महिन्यांत जर मला अंक पोंचला असता तर मी घाईघाईनें आपल्यास कळविलें असतें. पण तेंहि घडलें नाहीं व कथा दोन्ही ठिकाणीं प्रसिद्ध झाली. झालेल्या गोष्टीबद्दल मला खरोखरी अतिशय वाईट वाटतें—परंतु यांत माझा दोष कितपत आहे हें आपणच ठरवा. 'दीपावली' सारख्या नामवंत मासिकानें माझ्या विषयीं कसल्याही प्रकारचा गैरसमज मनांत ठेवूं नये अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे. माझ्या सविस्तर खुलाशानें आपलें समाधान होईल असें वाटतें. (आजच मी 'सुदर्शन'ला पत्र लिहित आहे.) आज बरींच वर्षे मी लेखन करीत आहे, पण अशीं गोष्ट केव्हांहि घडली नाहीं. ती व्हावी व आपल्या बाबतींत व्हावी याचा खरोखरी खेद होतो. कळावें, लोभ असावा ही विनंती.

आपला

**सुभाष भेंडे**

स. न. वि. वि.

'जुलै'चा अंक काल मिळाला. आभार. इतक्या दूर आल्यावर मराठी मासिकें फार थोडीं वाचायला मिळतात. त्यामुळें दीपावलीची दर महिन्याला उत्सुकतेनें वाट पाहतो. प्रत्येक अंकांतल्या कथा दर्जेदार असतात. कथा वाचल्यानंतर महाराष्ट्रांत गेल्याचा भास होतो. जवळीक वाटतें मग 'दीपावली' विषयीं.

नवीन कथाकारांच्या कथा प्रसिद्ध करून तुम्ही मराठी साहित्याच्या क्षितिजावर नवे तारे उदयास आणत आहांत. प्रभाकर नेरुरकरांची 'बंगला' कथा फार आवडली. 'दुबळा' आणि 'विद्रोह' ह्या वेगळ्या धर्तीच्या कथा पण बऱ्या आहेत. 'भीष्माचा डोंगर' दर अंकागणीक उत्सुकता वाढवीत आहे. वरील लेखकांस धन्यवाद.

'अरविंद गोखले' यांच्या 'एक एकटी'ची आतुरतेनें वाट पहात आहे. पु. भां'च्या आणखी कांहीं कथा दीपावलींतून द्याव्या असें वाटतें. कळावें लोभ असावा.

आपला

**कमलाकर परांजपे**

स. न. वि. वि.

जूनच्या अंकांतील पा. नं. ५७ वरील तुमच्या विनंतीस अनुसरूनच हें पत्र लिहीत आहे.

खरं म्हणजे मला तोल, वीर्यशुल्का, चंदन व चाहूल या कथा ठीक वाटल्या. पण त्यांतूनहि वर्णनाची व कथनाची शैली ह्या दृष्टीनें मी वीर्यशुल्काच पसंत करतो.

एकंदरीत विविध सदरें व मासिकाचा उठाव नजरेंत भरण्यासारखा आहे. किंबहुना माझ्या मतें दीपावली हे सुशिक्षित सुसंस्कृत व संयमशील वाचकांचे एक आवडतें मासिक असण्यास मतभेद नसावा.

आपला

**वसंत द. खेडकर**

*नवऱ्याच्या स्पर्शानें तिचं शरीर सुखावलं. ती धुंद झाली—भारावून गेली....पण दुसऱ्याच क्षणीं ती त्याच्यापासून अगदीं दूर झाली. आणि...*

—अरविंद गोखले

**कितीतरी** वेळ ती लिहीत होती. टेबलाच्या कांठाला वक्षःस्थळं रुतली होती व संथ जलाशयांत प्रतिबिंब पडावं तसा तिचा चेहेरा टेबलावरच्या कांचेंत उमटला होता. डाव्या कानाशीं महिरपि करणाऱ्या केसांच्या झुलपांवर तिनें कोपराशीं दुमडून वर उचललेल्या डाव्या हाताची मूठ टेकली होती आणि पावलं टाकायला शिकणाऱ्या लहानग्याचं मागून झब्लं धरावं तसं टेबलावर टाकलेल्या उजव्या हाताच्या लांबसडक बोटांत तिनें पेन धरलं होतं. दिव्याचा उजेड कागदावर पडला होता व त्यावर काळीभोर बायकी अक्षरं झपाझप उठत होती. कानाजवळच्या मनगटीं घड्याळाची, खिडकींतून दिसणाऱ्या संध्याकाळच्या वावटळीची—कशाचीच तिला शुद्ध नव्हती. बरेच दिवस अडून राहिलेल्या कथानकाची कोंडी फुटली होती व त्या प्रवाहांत तिनें स्वतःला झोकून दिलं होतं.

कधीतरी ती एकदम थबकली. बोटं दुखूं लागलीं, कुणाची चाहूल लागली कीं लेखनांतच समस्या निर्माण झाली—कुणास ठाऊक! पण लांबलचक होत चाललेलं एक वाक्य तिनें अर्धवट सोडून दिलं, पेन खालीं टाकलं, दोन्ही हात लांब करून बोटं मोडली, अर्धवट जांभई दिली, खिडकींतून बाहेर पाहिलं अन् मग ती खुर्चींतच विसावून बसली. पुढें लिहायची आतुरता होती—अन् नव्हतीहि. आज बऱ्याच दिवसांची मरगळ झडून गेली होती. खूप खूप लिहिलं होतं. मनासारखं, चांगलं लेखन झालं होतं. कसं तृप्त, प्रसन्न वाटत होतं. निर्मितीचा निर्भर आनंद! लेखन पुरं होण्यापूर्वींच त्याच्या यशाचा अंदाज आला होता. आतां थोडंच लिहायचं उरलं होतं. अन् तें सोपं, आवाक्यांतलं होतं. नुसतं उतरून काढायचं होतं. पडल्या पडल्या, डाव्या हातानेंहि करतां येईल असं. तेंहि आताच उरकून टाकावं असं वाटलं; पण तरी ती नुसती बसून राहिली.

तिला एकदम आठवण झाली संपादकाची. एक–दोन दिवसांत लेख पोस्टांत पडेल व मुंबईला पोचेल. कितीतरी दिवसांनीं तिच्याकडून साहित्य आल्यानें संपादक खूष होतील. ते अबोल, गंभीर संपादक खूष झाले कीं जिव्हणी नुसती रुंदावत व डोळयांनीं हंसत. तिच्या घरीं ते पांच–सहा वेळां आले होते. तीहि एकदां संपादकीय कचेरींत गेली होती. कागदपत्रांच्या गराड्यांत आरामखुर्चींत बसून संपादक तिचा लेख हंसऱ्या डोळ्यांनीं वाचीत आहेत असं तिला दिसूं लागलं. ती क्षणभर सुखावली—व मग जरा वावरली. त्यांना आवडेल ना साहित्य? ओळख असली, पूर्वी आठ–दहा कथा–कविता प्रसिद्ध केल्या असल्या तरी ते फार चोखंदळ आहेत. एखाद वेळेला 'नापसंत' म्हणून परत...

ती खुर्चीत सावरून बसली व खिडकींतून दूरवर दिसणाऱ्या धुरकट आकाशाकडे पाहूं लागली. तिच्या दोन कवितांचा तिरकस उल्लेख करणारा खवचट टीकाकार नको तरी आठवला. मग एका प्राध्यापकानें तिच्या कथांची केलेली स्तुति तिला स्मरली. लेखांची मागणी करणाऱ्या संपादकांची पत्रकं दिसूं लागलीं. एका दूरच्या वाचकानें तिच्या दीर्घ काव्यानें मोहून जाऊन तिला लांबलचक पत्र लिहिलं होतं–तेंच पुढ्यांत आलं. एका संमेलनांत स्वाक्षरी मागणारे पांच–सहा रसिक आठवले. अन् मग तिचं साहित्य वाचणाऱ्या, ज्ञात–अज्ञात, असंख्य वाचकांचा अस्पष्ट चेहऱ्यांचा जमाव तिच्यापुढें तरळत राहिला.

एकाएकी ती चमकून उभी राहिली. ओळखीचा वास, ओळखीची चाहूल–तिचा नवरा मागें उभा होता ! लेखनाच्या समाधींत ती सारंच विसरली होती. नंतर तिला आठवण आली संपादकाची, टीकाकारांची, असंख्य अनामिक वाचकांची. नवऱ्याला ती पार विसरून गेली होती.

' कधीं आलांत ऑफिसांतून ? ' ती त्याच्याकडे भ्रमिष्टासारखी पहात म्हणाली.

' अर्धा तास झाला. लेखनाची तंद्री लागली होती बाईसाहेबांची. म्हटलं डिस्टर्ब नको करायला–काय लिहीत होतीस ? कविता–कीं परवांची ती कथा ?' तो धोतराचा सोगा खांद्यावर टाकून टेबलाकडे गेला व लिहिलेल्या कागदांत डोकावूं लागला.

टेबला–खुर्चीच्यामध्यें अवघडत उभी राहून ती त्याच्याकडे बघत राहिली. धोतराचा सोगा, हनुवटीचा खड्डा, नाकांतून डोकावणारे दोन केस, डोळ्यांतून चमकणारी कौतुकाची छटा. जवळच उभी असलेली, पुढें झुकलेली, आज दहा वर्षे वेढून बसलेली त्याची आकृति. तिच्या छातींत कळ आल्यासारखं झालं. कसलंसं भय दाटलं. मग ती भानावर आली व त्याच्याबद्दलच्या मायेनें झुलूं लागली. किती कौतुकानें, आपलेपणानें तो तिनें जीव ओतून लिहिलेले कागद वाचीत होता. तिच्या साहित्याचा पहिला वाचक. तिचे सगळे टीकालेख, कथा, कविता, प्रथम त्याच्या नजरेखालून गेल्या होत्या. इंजिनिअरिंग फर्ममध्यें काम करणाऱ्या त्या तंत्रविशारदाला साहित्यातलं गम्य नव्हतं. इंग्रजी पुस्तकंहि तो फारसा चाळीत नसे. पण आपली पत्नी लेखन करते, ती साहित्यिक आहे ह्याचा त्याला फार अभिमान होता. सुंदर, पदवीधर, प्रेमळ–अन् खेरीज लेखिका. लग्नानंतर तिच्या व्यक्तित्वाचा हा नवाच पैलू त्याला समजला व तो सुखावून गेला. तिला संगीत येत असतं, टेनिस खेळायला येत असतं, तरी त्याला असाच आनंद झाला असता. बायको कविता करते, गोष्टी लिहिते, तिचं नांव छापून येतं, चार थोर लोक तिला भेटायला येतात...तो एका वेगळ्याच आपलेपणानें व नव्या कौतुकानें भारून गेला. तिला लेखन करायला सर्व सोयी, एकांत देऊं लागला. तिनें लिहिलेलं आसासून वाचूं लागला. तिच्यासाठीं साहित्यांत रस घेऊं लागला.

तिनें लिहिलेलें कागदाचे चतकोर तो नजरेखालून घालीत होता व ती मान कलती करून त्याच्याकडे पहात होती. कृतज्ञता ! केवळ कृतज्ञतेचीच भावना तिच्या उरांत दाटून येत होती. नवऱ्यानें उत्तेजन दिलं नसतं, लहर सांभाळली नसती, कौतुक केलं नसतं तर लेखन शक्य झालं असतं कां ? तो स्वतः लेखक नसेल, समीक्षक नसेल, जातिवंत रसिक नसेल–पण बायकोच्या गुणांना पूर्ण वाव देणारा...एकाएकी तिच्या काळजांत कुठें तरी परत दुखलं व तिनें वेदनेनें मान वळवली.

' झकास...मस्तच लिहिलं आहेस हं...' तो कागद नीट जुळवीत खाली ठेवीत म्हणाला. खरं म्हणजे त्याला फारसं समजलं नव्हतं. कांहीं अक्षरंहि नीट लागली नव्हती. ' फार उच्च आहे–आपल्याला तुमच्या साहित्यांतलं कळत नाहीं बुवा–' खरं म्हणजे मनापासून पण वरकरणी भाबडेपणाचं वाटावं असं त्याला म्हणायचं होतं. तिच्यावर, तिच्या साहित्यिक मित्रावर वजन पाडायला तो नेहमी हें पालुपद वापरी. तें वाक्य कानावर येणार म्हणून ती कावरीबावरीहि झाली. पण तो तें बोलला नाहीं. म्हणाला, ' मुलांचं कांहीं पत्र आलं ?'

धडपडल्यासारखीं ती खुर्चीतून दूर झाली. घाईनें म्हणाली, 'तें कपाटावर कार्ड आहे मिलिंदाचं. बेबीनेंहि एक ओळ लिहिलीय खालीं. मावशीकडे खूष आहेत दोघं. सगळी सुट्टी तिकडे रहाणार म्हणताहेत–'

सुट्टींत आपल्या मावशीकडे गेलेल्या दोन्ही मुलांचं पत्र तो कपाटाशी उभं राहून वाचूं लागला. तितक्याच आत्मीयतेनें परत ती त्याच्याकडे पहात उभी राहिली. स्वतःचीच तिला लाज वाटली आपला लेख वाचण्याआधीं मुलांचं पत्र वाचायला त्याला सांगायला हवं होतं. आपण सुद्धां एकदांच कार्ड वाचलं व कपाटावर टाकून दिलं. कथा संपविण्याची आपल्याला घाई होती. त्या नादात आपण मुलांना, नवऱ्याला विसरलो. नवरा [illegible] कारखान्यात राबून आला, बायकोचं लिखाण व मुलांचं पत्र तितक्याच तन्मयतेनें वाचूं लागला. आतां [illegible] तालात तो चिरूट ओढील, क्लबात जाईल. संसारात कसा तो केशरासारखा मिसळला आहे. आपण मात्र...

' सोनुबाईंनी चहा तरी करून दिला का आल्यावर...' त्यानें कार्ड दूर केलं तशी ती म्हणाली. त्याची घरी यायची वेळ झाली कीं ती व्हरांड्यांत वाट पहात असे. त्याच्यासाठीं रोज कांहीं नवा पदार्थ करून ठेवी. गृहिणीचीं कर्तव्यं ती

नेहमीच नीटपणें पार पाडीत; असे. लेखनाइतकाच तिच्या आदर्श संसाराचा बोलबाला झाला होता. एखाद्यांवेळीं मात्र लिहिण्याच्या नादांत सगळं विस्कटून जाई.

'हो–चहा घेतला, पोहे खाल्ले...तूं लिहीत होतीस म्हणून व्हरांड्यांत बसलों होतो. तुझा चहा झाला नं? थकली असलीस तर आणिक एखादा कप–सांगू सोनुबाईला?...'

पुन्हां काळजी. पुन्हां लेखक पत्नीला सांभाळणं. तिला खरंच थकवा वाटला. पण ती म्हणाली, 'नको चहा, मी स्नान करते...'

स्वैंपाकघरांत डोकावून ती स्नानगृहांत गेली. गिझर सुरूं करतांना तिला एकाएकी शहारल्यासारखं झालं व बावरून तिनें बंद दारांकडे पाहिलें. नवऱ्यानें तिची कथा खरंच काळजीपूर्वक वाचली? त्या प्रथम पुरुषी लिहिलेल्या नायिकेच्या कहाणींत लग्नापूर्वीचं प्रेमप्रकरण रंगवलं होतं. नाहीं–तिच्या स्वतःच्या आयुष्यांतलं–नाहीं. तिनें स्वतः कुणावर उत्कटून प्रेम केलंच नव्हतं. श्रीधरवर सुद्धां नाहीं. नायिकेसारखी ती नवऱ्यावर नाखूष नव्हती. केशवरावांशीं लग्न करायला तिनें पूर्ण संमती दिली होती. लग्नापूर्वी तिला त्यांचा परिचय करून दिला होता व तिला ते आवडले होते. अजून ते तिला आवडत होते. अधिकच. ती मुळींच अस्वस्थ नव्हती. श्रीधरची कधींसुद्धां तिला आठवण येत नव्हती.

तरी पण ही कथा प्रसिद्ध झाली कीं लोक काय कल्पना लढवतील? लेखिकेच्या गतायुष्याशीं संबंध जोडतील? निदान ओळखीचे साहित्यिक तसे तर्कवितर्क करीत बसतील. तिच्या एका कवितेबद्दल लेखकांच्या बैठकींत झालेल्या गप्पा तिच्यापर्यंत पोचल्या होत्या.

तिला त्या कवितेंतील ओळी आठवल्या;

कधी कधी मनाच्या सशाला
फुटतात ससाण्याचे पंख
स्वतःचंच घरटं विस्कटून
काळजाला करतो डंख
अस्मानांत झेपावतो धरण्यास चंद्र
व्यभिचारी—

कुठल्या क्षणीं तिनें ही कविता लिहिली? अनुभूति–कीं केवळ अनुकरण? हा सुबक संसार, देखणी मुलं, मायाळू नवरा–सगळं उस्कटायचं आहे तिला? अन् कुठें जायचंय? कुणाकडे–कशाला?

उघडं अंग कोरडं करून तिनें आरशांत पाहिलं. तिला एकदम नवऱ्याची आठवण झाली. ह्या क्षणीं नवऱ्यानें यावं नि आलिंगन द्यावं, आपलंसं करावं असं तिला तिरीमिरीनें वाटलं. साहित्य–निर्मितींत घोटाळत राहिलं कीं तिला शरीरसुखाची आठवण होई. त्याचा आसरा घ्यावासा वाटे. साहित्यनिर्मिती नि संभोगसुख यांचं इतकं जवळचं नातं असतं? आपला एकाकीपणा लपविण्यासाठीं आपण नवऱ्याच्या मिठींत जातो? तिचं शरीर थरथरूं लागलं. तिला पारोसं वाटलं. पुन्हां पांणी अंगावर घ्यावसं वाटलं. पण साडी वेढून ती बाहेर आली.

नवरा व्हरांड्यांत बसला होता. आरामखुर्चीत रेलून, पाय समोरच्या घडवंचीवर टाकून नुसता बसला होता. त्याच्याकडे बघत ती केस सारखे करीत होती. फार वर्षांनीं तिच्या मनात एकदम आलं कीं तो लेखक असता तर? निदान टीकाकार? संपादक, प्राध्यापक, साहित्याशीं संबंध असलेला...? मग आपल्या मनांतलीं वादळं, हुरहूर, सगळं त्यानं समजून घेतलं असतं. नुसतं लिबलिबीत कौतुक करीत न बसतां आपल्या भावना कल्पनांना त्यानें जोपासलं असतं...पण मग ती कविता ...आज लिहिलेली ती कथा...साहित्यिक नवऱ्यानें त्याचा काय अर्थ घेतला असता? काळजांत खोल कुठेंतरी संशय दडवून ठेवला असता? अन् आपणहि त्याच्या लेखनांतून कुतर्क काढले असते? कदाचित् दोघंहि एकमेकांच्या भावना विकृतपणें कुरवाळीत बसलो असतो. तें साहित्यिक जोडपं, साहित्यिक संसार थाटून बसलं आहे तसं. एकमेकांवर कावत कुढत, अन् मनांनीं अखेर एकमेकांपासून अधिक दुरावत......

फाटकाशीं हंसण्याबोलण्याचा आवाज आला व तिनें पडद्याच्या फटींतून बाहेर पाहिलं. वेगवेगळ्या वृत्तीचे चार साहित्यिक एकत्र जमून तिच्याकडे सहज म्हणून आले होते. दीर्घकथा लिहिणारा अबोल तवकीले, कविता लिहिणारा सुरेश व त्याची कथा लिहिणारी पत्नी सुरेखा, कधीकाळीं थोडंसं चांगलं लिहून हल्लीं धडाकेबाज परिक्षणं खरडणारा प्राध्यापक महाशब्दे.

'या–या. आज अगदीं कपिलाषष्ठीचा योग आहे–' तिचा नवरा उठून स्वागत करीत म्हणाला.

'मालविकाबाई आहेत कां?' कुणीतरी विचारलं व सगळे व्हरांड्यांत येऊन खुर्च्यांवर बसले.

'बोलावतो तिला. लिहीत बसली होती–' नवरा एकदम गंभीरपणें म्हणाला.

'अहो, मग त्यांची समाधी मोडूं नका. आम्ही पुन्हां येऊं. कांहीं काम नव्हतं. सहज म्हटलं, दिसल्या नाहींत ह्या बऱ्याच दिवसांत...'

'बसा हो! शिष्टागमने अनध्याय:—नवरा म्हणाला व मोठ्यानें हंसला. 'काय घेणार तुम्ही? चहा, कॉफी कीं सरबत?...'

ती आडोशाला झाली व गलबलून गेली. साहित्यिक घरीं आले आहेत ह्याचं तिला बरंच वाटलं. नाहीं म्हटलं तरी लेखनाविषयीं बोलण्यांत कसलंसं सुख वाटतं. मनांतला निचरा दूर होतो. दुसऱ्या एकाकी लेखकांची वरवरची बेफिकीर पण त्या खालची असहाय्य वृत्ती पाहिली कीं आधार वाटतो. नवरा आंत यायच्या आंत तिनें सोनुबाईला कॉफी करायला सांगितली व ती व्हरांड्यांत आली.

'काय लेखन चाललं होतं एवढं?' सगळ्यांनीं गलका केला.

'विशेष नाहीं. स्त्री मासिकासाठीं एक मामुली लेख...' ती हात दडवीत म्हणाली. आपण काय लिहितों हें धडपणें सांगायचं नसतं हा संकेत तिला ठाऊक होता. इतर लेखकांनाहि ठाऊक होता. सरळ खोटं बोलून ती मख्खपणें बसली. मालविकानें नक्कीच एखादी कथा संपवली आहे हें सगळ्यांनीं ताडलं. मालविकाला त्याची पर्वा नव्हती. अशी पात्रं जमलीं कीं वेगडी संवादाची एक उथळ एकांकिका सुरूं होतें हें तिला ठाऊक होतं.

तिचा नवरा तवकील्याची सिगरेट पेटवून परतला व तिच्याजवळ कोचांत बसला. तो एकटाच ह्या वर्तुळांत वेगळा वाटत होता. सुखी, निरोगी. मालविकालां क्षणभर त्याचा अभिमान वाटला. पण मग आपली खुर्ची सोडून तो मुद्दाम बायकोजवळ येऊन बसला हें तिला खुपलं. आपण हिचा नवरा आहोंत हें त्याला दाखवायचं होतं! तिला वाटलं तो कठोर चेहरा धारण करणार व मग एकदम खुळ्यासारखं बोलणार. कोचांतल्या कोचांत तिला कोंडल्यासारखं वाटलं व ती कॉफी आणायला आंत घरांत गेली.

सोनुबाई गॅसवरून कॉफी आटवीत होती. मालविकानें कपबशा कपाटाबाहेर काढल्या. दोघी कॉफीपानाची सिद्धता करूं लागल्या. तेवढ्यांत सुरेखा आंत आली व म्हणाली, ' मी करते मदत—'

' नको, झालंच...' मालविका म्हणाली. सुरेखा स्वैपाकघरांत आली ह्याचं तिला आश्चर्य वाटलं. स्वतःच्या घरी देखिल ती चुलीपाशी जात, नसेल. डब्यांतलं जेवण व सारावेळ लेखन. मुलांचं सगळं नवऱ्याकडून करून घेई. दुसऱ्या ठिकाणीं राहायला बसायला गेली तरी ती पुरुषांत बसून राही. चर्चा करी अगर पुस्तकं वाची. तिचं कांहीं बिनसलं होतं काय ? मालविकानें एकदम विचारलं,

' काय लिहिताय सध्या—'

' एक कथा डोक्यांत आहे. जमत नाहीं, सारखी धडपडतेय. तीनदां लिहून काढली...'

सुरेखा प्रथमच असं खरं, मनापासून बोलली असावी. ' लेखन जमत नाहीं, लिहिलं नि फाडून टाकलं–' वगैरे दोघं नवरा–बायको नेहमीं बडबडत व आपण बेफिकीर, बेबंद आहोंत असा आव आणीत. पण आजचं सुरेखाचं बोलणं अस्वस्थतेंतून आलं होतं. मालविकाला तिच्याबद्दल अनुकंपा वाटली. लेखनांत गुरफटलं कीं मनावर केवढा ताण पडतो. सगळं कसं पारदर्शक नि परकं होतं. रथ दोन अंगुळं अधांतरी चालतो. वेदना पहिलटकरीणीपेक्षां तीव्र असतात. मालविकाला वाटलं, सुरेखाला आधार द्यावा. भिंतीशीं उभं राहून शिंकाळ्याला झोके देणाऱ्या कृश, अस्वस्थ सुरेखाकडे तिनें हळूंच पाहिलं. अगदीं निपटलेली दिसत होती ती. सुरेश तिला ' बाई ' म्हणत असे. बायकोचा चार ठिकाणीं ' बाई ' म्हणून नवऱ्यानें उगाच उल्लेख करीत रहायचं हें मालविकाला अश्लील वाटलं. सुरेशच्या सेक्सी कविता आठवल्या. पुन्हां सुरेखाकडे तिनें रोखून पाहिलं. वाटलं आपण हिला काय आधार देणार ? हिचा नवराहि हिला काहीं मदत देऊं शकणार नाहीं. हिचं लेखकाचं दुःख हिनेंच भोगलं पाहिजे. असं स्वतःशीं जळत राहिलं पाहिजे...

दोघीं कॉफीची तबकं घेऊन बाहेर आल्या तेव्हां तवकीले रंगांत येऊन बडबडत होता. ती दिसल्यावर तो थांबला. कॉफीचे पेले वाटेपर्यंत तिच्या तें लक्षांत आलं नाहीं. कप घेऊन ती बाजूच्या खुर्चीवर बसली व नवरा एकदम बडबडूं लागला तेव्हां तिला तें जाणवलं. तवकीलेकडे तिनें चोरून पाहिलं. ह्याच तवकील्यांनी बारा वर्षांपूर्वी ती जेव्हां नुकतीच लिहूं लागली तेव्हां तिची ओळख करून घेतली होती व तिचा हात धरायचा यत्न केला होता. तिनें उत्तेजन दिलं नाहीं. पण थोर लेखकाची शारीरिक लगट तिच्या हृदयात ठसा उमटवून गेली होती. अनेक रूपें घेऊन ती आठवण वारंवार येई. आकर्षण, आश्चर्य, तिटकारा, त्वेष...तवकीले लंपट म्हणून प्रसिद्ध होता. अभिजात दीर्घकथा, अनिर्बंध आयुष्य–त्याच्या असल्या आयुष्याबद्दल मालविकाला ओढ होती. तसं आयुष्य तिला मिळालं तर तिचं गाऱ्हाणं आटोपेल ? अधांतरी वाटणार नाहीं. ? पण तवकीलेच्याहि डोळ्यांत कसलीशी अस्पष्ट अस्वस्थता नव्हती काय ?...

' लेखक संघानें कॉपीराईटच्या कायद्यासंबंधीं पत्रक काढायचं ठरवलंय–कळलं तुम्हांला ?' प्राध्यापक महाशब्दे मध्येंच म्हणाला. साहित्यचर्चेला परत उधाण आलं. लेखकांचे हक्क, अडचणी, संपादकांची

...पान ४३ वर

श्री. जॉर्ज मोलनार हे ऑस्ट्रेलियाचे ख्यातनाम व्यंग-चित्रकार आहेत. जगभर केलेल्या प्रवासांत त्यांनीं जें कांहीं आपल्या उफराटया नजरेनं पाहिलं, त्याचंच व्यंगात्मक स्वप्नरंजीत रेखाटन करणारीं व गेल्या अंकापासून सुरू झालेलीं....

हींच तीं व्यंगचित्रात्मक

# चि*त्रं*प*त्रें*

अनुवादक : दि. श्री. कराडकर




### उत्तर कॅरोलिना :

स. न. वि. वि.

मी उत्तर कॅरोलिना विद्यापीठांत आहे. हें एक सुखी राज्य आहे. न्यूयॉर्कमधील नव्या नव्या क्लृप्त्यांनीं इथें वेळ मोजली जाते.

उत्तर कॅरोलिना विद्यापीठ हें अमेरिकेंतील सगळ्यांत जुनं विद्यापीठ. आतां मला इतर विद्यापीठांना भेट द्यायची आहे हें जाणून सुरक्षितपणें म्हणायचं तर अमेरिकेंतील प्रत्येक विद्यापीठ हें जुन्यांतलं जुनं, मोठ्यांतलं मोठं आणि चांगल्यांतलं चांगलं आहे.

इथें शुद्ध तात्विक विषय शिकविले जातात, शिवाय 'योजना' व 'वृत्तपत्रे' हे विषय आहेतच.

सगळे यशस्वी विद्यार्थी संस्थानांचें ( States ) गव्हर्नर्स होतात. अयशस्वी विद्यार्थी पैसाच पैसा मिळवितात आणि विद्यापीठाला दान म्हणून देतात. पण गव्हर्नरांचें प्रमाण जास्त असल्यामुळें विद्यापीठाला पैशाची चणचण भासतेच.

विद्यापीठाचें स्वतःचें 'स्टेडियम' आहे. खेळाचीं मैदानें आहेत. अद्ययावत नाट्यगृह ( खुलें व बंदिस्त दोन्ही ) आहे. चर्च, व्यायामशाळा; पोहण्याचे तलाव, म्युझियम, आर्ट गॅलरी, कबरस्थान, वेधशाळा, हॉटेल, लायब्ररी–सगळं सगळं आहे.

लायब्ररीमध्यें आठ लक्ष पुस्तकें आहेत. त्या पुस्तकांत मी शोधत होतो तें चित्रकला व शिल्पकला ह्यावर प्रसिद्ध असलेलं एकमेव पुस्तक–'योजना'–लेखक श्री. बाळकोबा सांगकामे.

तें तिथं नव्हतं. ( हाय ! )

कदाचित् विद्यापीठ म्हणावं तितकं चांगलं नाहीं तर.

### ॲटमबॉम्बचा कारखाना :

स. न. वि. वि.

जिथें पहिला ॲटमबॉंब बनविण्यांत आला ती ही जागा.

ह्या जागेसंबंधीं भलतीच गुप्तता पाळण्यांत येते व कुठल्याहि नकाशांत ही जागा सांपडणार नाहीं. अगदीं नव्या नकाशांतहि. शत्रू फार तर एवढंच करूं शकतो कीं जुने नकाशे उलथेपालथे करायचे व नव्या नकाशांत त्यांतील ज्या जागा दाखविल्या नाहींत त्या हेरायच्या. त्यांना ती सांपडते. तिचं नांव Oak Ridge. पण त्यामुळें त्यांना कांहींही उपयोग होत नाहीं.

पाळीव शास्त्रज्ञांनीं ही जागा गजबजली आहे. शांततेच्या उद्योगापायी ते 'ॲटम'ची चांचणी करीत असतात. मी ह्याचा खुलासा विचारला. मला सांगण्यांत आलं–पाणी तापविण्यासाठीं ह्या शक्तींचा उपयोग करण्यांत येणार आहे. 'मग कोळशाचा काय उपयोग ?' मी विचारलं, सगळे माझ्याकडे तिरस्कारानें पाहूं लागले.

सुरवातीला बॉंब करण्यासाठीं जी पद्धत होती त्यांत मोठमोठीं लोहचुंबकें वापरली होती. ह्यामुळें प्रत्येक शास्त्रज्ञाच्या घड्याळावर अनर्थ ओढविला पण म्हणूनच तो बॉम्ब वेळेवर होऊं शकला.

प्रत्येकजण तिशीच्या आंतला आहे. जर्मन, स्पॅनीश, हंगेरियन, इटालियन, चिनी, फ्रेंच, रशियन ह्या भाषा इथें बोलल्या जातात. जवळ जवळ प्रत्येकजण इंग्लीश वाचूं शकतो.

काम अगदीं सोपं. ऑफिसांत जायचं, दरवाजावर 'Danger' अशी पाटी लटकवायची आणि कॉमिक पुस्तकं वाचीत बसायचं.

इथें कामाला असलेला प्रत्येकजण 'जिनियस' आहे. संभाव्य स्फोटापासून त्यांचा बचाव करण्यासाठीं त्यांच्या बुटांभोंवती मोकादी पट्ट्या असतात.

ते कोटावर विशिष्ट तऱ्हेचे बिल्ले अडकवितात. हे बिल्ले 'रेडिएशन'चा प्रत्येकावर किती परिणाम झाला हे दर्शवितात. प्रत्येकजण जिवंत आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं मधूनमधून बिल्ल्यांची तपासणी केली जाते.

इथें दारूबंदी आहे.

'जरा जपून हं.' एक शास्त्रज्ञ आपली बॅग हमालाला देत म्हणाला, "त्यांत 'फ्लॅश्‌बल्बस' आहेत." 'साहेब' हमाल उत्तरला, "तुमचे फ्लॅश्‌बल्बस 'लीक' होतायत."

**ताहिती:**

---

**स. न. वि. वि.**

फ्रान्समध्यें गेलेला प्रवासी पहिला शब्द शिकतो—'लामूर.' इटालीमध्यें 'व्हिनो' जर्मनींत 'व्हबोंटन' इंग्लंडमध्यें 'सारी.' ताहितीमाध्यें 'वहेनी'. (Vahenee) हा शब्द पटकन लक्षांत राहतो (कदाचित मराठींतील 'वहिनी' चं 'इंप्रेशन' असावं) ह्याचा अर्थ 'वहिनी' असा नसला तरी 'बाई' असा आहे. म्हणजेच ह्या बेटावर 'वहेनी' बक्कळ आहेत. पाहिजे ती घ्या.

ताहितीहून—



आदिप्रवासी म्हणून गणल्या जाणाऱ्या कांहीं थोड्या प्रवाशांत कॅप्टन कुक होता. भरमसाठ खर्च करून 'रॉयल सोसायटी' नें त्याला 'व्हीनस' पहाण्यासाठीं धाडलें होतें. त्याच्या खलाशांनीं हेंच केलं. चक्क स्थानिक पोरींना 'न्याहाळलें.'

ताहितीमधील पोरी हवा तसा दंगा करतात. रुपर्ट ब्रुक नांवाच्या प्रवाशाचा पाय कापला गेला तर त्याला कित्येक दिवस ह्या बेटांत बिछान्यावर पडून रहावं लागलं. (पोरी ?)

जिथें श्वास घ्याल तिथें तुम्हांला फुलांचा सुगंध आढळून येईल. 'लॅन्डस्केप्स' हवी तेवढी. निळें आकाश म्हणजे निळ्या समुद्राचं प्रतिबिंब. जीवन साधं, शांत आहे.

हें लहानसें बेट होड्यांनीं खच्चून भरलें आहे. लांबून डोलकाठ्या शत्रू-सैन्याच्या भाल्यासारख्या वाटतात. जगांतून अनेक लोक येतात, इथला आनंद लुटण्यासाठीं हपापलेले असतात. ताहिती म्हणजे सुसंस्कृत माणसासाठीं एक भयंकर आव्हान आहे. आपण स्वीकारूं कां तें !

येथील रहिवाशी सुंदर सुंदर फुलांचा पोषाख घालतात. लाल आणि पांढरी फुलें–पॅरीस मे बनी हुई.

प्रगतीशील युगानें सगळ्या ताहितीयांना सायकल चालवायला शिकविलें आहे. प्रत्येकजण लहानसें पेट्रोल–इंजिन लावलेली ढकल-सायकल चालवितो.

क्रमशः ...



*भारताच्या स्वातंत्र्यासाठी*
*आपल्या पराक्रमाची, चातुर्याची व*
*मुत्सद्देगिरीची शर्थ लावणाऱ्या*
*स्वातंत्र्यसंगरांतील अद्वितीय सेनानीची*
*ही जिवंत व अविस्मरणीय गाथा...*

लेखक:–शिवचंद्र वाजपेयी
अनुवादक:–प्रभाकर चेंदवणकर

# अखेर कठोर काळानें मात केली

**हा महंमदअल्ली कोण ?**

सन १८६२ ते ७७ च्या दरम्यान एक महत्त्वपूर्ण घटना मध्य आशियांत घडली. काशगर, यारकंद, खोतान्, आदि प्रदेशांनीं चीनविरुद्ध दंड थोपटले. बंड पुकारलें. वास्तविक पहाता हे प्रदेश चीनच्या ताब्यांत होते, तरी त्यावर नाममात्र चिनी सत्ता होती आणि तदनंतर चिनी राज्यसत्तेखालीं असलेल्या–राहिलेल्या, उरलेल्या चिनी प्रदेशाविरुद्ध बहाद्दूर सेनापति महंमदअल्लीनें क्रांतीचा वणवा पेटवून दिला. परंतु महंमदअल्लीच्या नांवाखालीं वावरणारा हा क्रांतिवीर कोण होता हें एक कोडेंच होतें ! ! !

सन १८६२ च्या एका संध्याकाळची गोष्ट आहे. सूर्य अस्तास जाण्याच्या बेतांत होता. खोतान् राजधानींतील इल्चिकी सडकेवर एक मदारी चालला होता. उंचपुरी भलीभक्कम आसामी होती. त्याच्या अंगावरचे सारे कपडे जीर्ण झालेले होते. खाकेंत एक झोळी लटकलेली होती. एका हातांत डमरू व दुसऱ्या हातांत दोरीनें बांधलेला माकडाचा नर–मादीचा जोडा होता. त्याच्या एकंदर पेहरावावरून ती व्यक्ति तेथल्या प्रदेशांतली नसावी. तोंडावर बरीच दाढी वाढलेली होती व चेहरा अतिशय चिंताक्रांत दिसत होता. चिंतेनें चेहरा इतका आकसून गेला होता कीं पहाणाऱ्यांस वाटावें, कीं भयंकर आपत्तीचा डोंगरच जणूं त्याच्यावर कोसळला आहे. परंतु इतकें जरी असलें तरी त्या व्यक्तीचा चेहरा तेजःपुंज दिसत होता. त्याचे पाय धुळीनें इतके माखले होते कीं बऱ्याच लांबून तो चालत आला असावा. आणि तो एवढ्या दूरवर चालत कां आला असावा हें समजावयास मार्गच नव्हता. एवढेंच नव्हे तर त्या मदारीबरोबरच त्याच्यासारखाच पेहराव केलेल्या आणखी दोन व्यक्तीहि होत्या आणि त्या दोन व्यक्ति मदारीच्या मागून मागून थोडं अंतर ठेवून चालत होत्या.

**मदारी व महंमदअल्ली एकच !**

त्या गांवच्या लोकांनीं तेव्हांच ओळखलें होतें कीं, हा मदारी या गांवचा तरी दिसत नाहीं. परंतु गांवच्या लोकांना थोड्याच दिवसांनीं कळून चुकलें कीं, आपल्या बादशहानें नुकताच फौजेचा सेनापति नेमला आहे. तो त्या दिवशीं संध्याकाळीं जीर्ण कपड्यांत दिसलेल्या मदारीसारखाच दिसत होता. त्या नव्या सेनापतीचें महंमदअल्ली असें नांव सांगितलें गेलें. परंतु त्याचें खरें नांव काय होतें हें फारच थोड्याजणांना माहीत होतें. हा नवा सेनापति अतिशय बुद्धिमान होता व त्याचें रणकौशल्यहि असामान्य होतें. या नव्या सेनापतीच्या ठिकाणीं सैन्य संचलनाची अद्भूत क्षमता व असामान्य बुद्धिमत्ता पाहून त्याच्या खरेपणाविषयीं साशंकता वाटत होती. परंतु दृढतापूर्वक निश्चितपणें महंमदअलीच्या नांवाखालीं वावरणारे नानासाहेब पेशवेच असतील असें दृढतापूर्वक, निश्चितपणें सांगणें कठीण होतें. परंतु २२ सप्टेंबर १८५५ रोजीं भारतांतील एक इंग्रज गणितज्ञ मि. जॉन्सन खोतातवरून गेले. त्यांच्या कानीं या नव्या सेनापतीचा बराच बोलबाला गेला व त्यानें परत भारतांत गेल्यावर इंग्रज सरकारच्या कानावर ही गोष्ट घातली. या नव्या सेनापतीचें रंग, रूप, रणकुशलता व गुणवत्ता मि. जॉन्सननें सांगितलेल्या एकंदर वर्णनावरून नानासाहेब पेशव्यांच्या वर्णनाशीं बहुतांशीं जुळणारी होती. मि. जॉन्सननें सांगितलेल्या हकिगतीवरून इंग्रज सरकारच्या आश्चर्याला पारावर राहिला नाहीं.

विठूरचे नानासाहेब पेशवे मरण तरी पावले असावेत अथवा परागंदा तरी झाले असावेत असाच इंग्रज सरकारचा समज तोपर्यंत होता. परंतु नानासाहेब पेशवे जिवंत असून ते चीनमधील खोतात येथें सेनेचें अधिपत्य सेनानीच्या कौशल्यानें सांभाळीत असल्याचें मि. जॉन्सन यांनीं दिलेल्या या महत्वपूर्ण बातमीनें पुनःश्च इंग्रज सरकार जागें झालें. अशा तऱ्हेची बातमी यापूर्वींहि इंग्रजांच्या कानीं आली होती. आणि मि. जॉन्सननें दिलेल्या या बातमीनें तिला दुजोरा मिळाला.

**नाना मेल्याचें त्यांच्या मातेनें सांगितलें**

या खळबळजनक बातमीनें इंग्रज अधिकाऱ्यांच्या डोळ्यासमोर १८५७ च्या क्रांतीचा वणवा उभा राहिला. क्रांतिसमराचें

दृष्य उजाळून उठले. त्या ठिकाणीं त्यावेळींच फक्त त्यांना नानासाहेब पेशव्यांचें दर्शन झालें होतें. या युद्धांतल्या रणधुमाळींत नानासाहेबांची वीरश्री प्रत्ययास आली होती. नानासाहेबांच्या प्रगाढ व्यक्तित्वाचें मनोज्ञ दर्शन घडलें होतें. गद्दर येथें नानासाहेबांचा पाडाव झाल्यानंतर ते नेपाळच्या दिशेला पळून गेले. त्या ठिकाणीं इंग्रजांची कट्टर दुष्मन् लखनौची बहादूर बेगम हजरतमहल आपल्या उरल्या सुरल्या सेनेनिशी जाऊन मिळाली. एवढी खबर इंग्रजांना होती. तद्नंतर इंग्रजांनीं नेपाळशीं संधान बांधून नेपाळचें पंतप्रधान जंगबहादूरवर एवढें दडपण आणलें होतें कीं कसेंहि करून त्यांच्या हद्दींत पळून आलेल्या नानासाहेबांना पकडून इंग्रजांच्या हवाली करावें. इंग्रजांच्या दडपणानें प्रभावित होऊन जंगबहादूरनें इंग्रजांशीं कांहीं शर्तींवर नानासाहेबांस पकडून स्वाधीन करण्याची तयारीहि दर्शविली. परंतु एवढ्यांत एके दिवशीं अचानकपणें जंगल व डोंगर कपारी पार करून नानासाहेबांची वृद्धमाता जंगबहादूरच्या महालांत अवतरली. रडून रडून तिनें आकांत मांडला व आपल्या पुत्राचा (नानासाहेबांचा) महामारीनें मृत्यु झाल्याचें त्यांस शोकाकुल होऊन सांगितलें व आतां नानासाहेबांच्या शोधतपासाचें प्रयोजन नसल्याचें विनविलें. प्रत्यक्ष नानासाहेबांच्या मातोश्रींच्या तोंडून सांगितली गेलेली नानासाहेबांच्या मृत्यूची हकिगत खरी वाटून जंगबहादूरनें नानांच्या शोधतपासाचा प्रयत्न सोडून दिला, तद्नंतर जंगबहादूरनें आपल्या प्रासादानजीक नानांच्या मातोश्रीस एक महाल दिला. त्या ठिकाणीं ती व तिच्या बरोबर असलेली तिची तेजस्विनी सून दोघी मिळून राहूं लागल्या व त्या ठिकाणीं भगवान् पशुपतीची पूजाअर्चा करण्यांत आपलें राहिलेलें आयुष्य घालवूं लागल्या. त्या ठिकाणीं वाराणसी, काशी, प्रयाग, गया येथून ब्राह्मण पंडित येत असत व धर्मग्रंथांचें पाठ चालू होतें.

**घोड्यावरून येणारा तेजस्वी पुरुष—**

परंतु कांहीं चिकित्सक लोकांच्या नजरेस एक गोष्ट आली होती ती ही कीं, महालांत नानांच्या वृद्धमातेबरोबर रहात असलेली नानांची विधवा, पत्नीच्या केसांच्या भांगेंत अस्पष्ट कुंकुम रेषा पतिनिधानानंतरहि दिसत होती. तसेंच पायामधलीं सौभाग्याचीं आवरणेंहि तिनें काढलीं नव्हतीं. तसेंच श्राद्धतर्पणासाठीं कांहीं ब्राह्मण येत होते. दानधर्महि चालू होते. दानधर्मांच्या प्रसंगीं हिंदु ब्राह्मण येत असत तसेंच मुसलमान फकिरहि येत होते. तसेंच मस्तकांवर चंदनाचें पट्टे ओढलेला व भगवी वस्त्रें परिधान केलेला एक अत्यंत तेजस्वी पुरुष घोड्यावरून दौडत दौडत येत असे. त्याच्याबरोबर त्याचा शरीरसंरक्षकहि असे. कदाचित् नानासाहेब पेशवे जिवंत असून तेंच तर आपल्या पत्नीला व वृद्धमातेस भेटण्यासाठीं या छुप्या वेशांत तर येत नसावेत ? मग नानासाहेबांच्या वृद्ध मातेनें नेपाळच्या जंगबहादूरकडे नानासाहेब मृत् झाल्याचें सांगितलें तें खोटें खोटेंच कां ? कीं नानासाहेबांच्यामागचा इंग्रजांचा ससेमिरा चुकविण्यासाठीं पद्धतशीरपणें केलेला चकवा ?? चकवाच असणें अधिक संयुक्तिक वाटतें. कारण अशा तऱ्हेनें इंग्रजांच्या डोळ्यांत धूळ टाकून आपल्यामागचा ससेमिरा कमी करण्याचीच कल्पना असावी. आणि या छुप्या वेशांत हिंडून गद्दरनंतरच्या पराजयानंतर इतस्ततः हिंदवी सैन्याची जमवाजमव करून पुनः इंग्रजांविरुद्ध रण-युद्ध क्रांति फैलावण्याचा त्यांचा पद्धतशीर प्रयत्न तर नसावा ना ??

...पान ४६ वर

# अग्निचा डोंगर




**चावडीवरचा** बुदग्या महार गळ्यांत ढोल बांधून दवंडी देत गांवांत फिरत होता.

वर आडरानांत तो धर्म्या रुद्रेला भेटला.

पत्र्याच्या डब्यांची कावड खांद्यावर, आंत पाणी बचक् बचक् डुचमळतंय्. उभी चढण. धाप लागलेली. एकदां पुढं, मग मागं असा तालावर तोल सावरीत धर्म्या वाट चढत होता. आणि आपल्याशींच कांहीं बडबडत होता. त्याची ती संवय होती. चारचौघांत दांतखिळी बसेल पण एकान्तात बाकी वाघ. आपला एकटाच बोलत राहील. हें बघून कोणी हंसलं, चेष्टा केली कीं मग भडकलाच.

बुदग्याला हें ठाऊक. आणि म्हणून मुद्दाम त्यानं विचारलं, ' कोणाशीं बोलतोस रे ! कारभारणीशीं !'

' मेलास तूं. गिळला आरानं. जा हीच दे दवंडी गांवांत. ' खडी धर्मवाणी झाली.

आतां त्याला असं चिडवण्यांत लोकांना काय सुख मिळत होतं तींच जाणत. पण तें मिळत होतं नक्की. कारण त्याच्या शिवीशापानं सहसा कोणी चिडत नसे. हंसत. अधिकच थट्टा करीत.

बुदग्यासुद्धां हंसला. म्हणाला, ' छाः ! खुळाच खुळा ! अरे आजची दवंडी–'आणि महार कनवटीची पुडी काढून चुना–तमाखू चोळूं लागला.

"ऐका हो ऐका ! डॉक्टर आला आहे. तरी देवी टोचून घेण्यासाठीं पोरंबाळं घेऊन लोकांनीं चावडीवर हजर व्हावं. आलं नाहीं तर गुन्हा. सरकार कायदेशीर इलाज करील. ' खांद्यावरची कावड उतरून धर्म्यानं बुदग्याचीच नक्कल केली. वर हसून म्हटलं, ' म्हारानं दवंडी दिली कीं ओळखावं पोरांवर धाड आली.'

' धर्म्या, अरे आजची दवंडी वेगळीच आहे. तशी सरकारी सुद्धां नाहीं. बुदग्या खाजगी स्वरांत म्हणाला.

' म्हणजे रे !'

' तो आपला गोळेसाहेब—'

धर्म्याच्या टाळक्यांत प्रकाश पडेना. केस खाजवीत तो विचारांत पडला.

तसा महार त्याला समजावून सांगूं लागला, ' तो म्हातारा भट—कंपनीचा मॅनेजर. हां ! तोच. काय ?'

' नांव नको काढूस.' धर्म्या एकाएकीं बिघडला. डोळे वटारून गुरगुरूं लागला. दाजी नाबराचं हें कुत्रं भलतंच तिखट होतं.

' कबूल ! नाहीं घेत.'

' अरे, फुकट तुझ्या जिभेला विटाळ. '

जातीचा महार, तेव्हा बुदग्याला विटाळाचं कौतुक नव्हतं. दांत विचकत त्यानं म्हटलं, ' तेव्हां सांगायची गोष्ट...'

आणि अशी सुरवात करून चावडीवरचा सनसनाटी रिपोर्ट त्यांनं धर्म्याला दिला.

कालपासून चावडीवर एकेका साहेबाचा मुक्काम पडत होता. फौजदार, मामलेदार, प्रांत, डी. एस. पी.असे एकापेक्षां एक चढ आणि वरचढ साहेब. त्यांच्या तब्येती आणि तैनाती संभाळता संभाळता पोलीस पाटलाची मात्र पुरेवाट होत होती. एरव्हीं गांवचा राजा हा. त्याच्या नांवाचा खूप वचक. दरारा वाटावा असाच करडा आणि कडाडणारा आवाज. पण कालपासनं पोलीस पाटलाची नुसती धांवपळ चालली होती. चावडीवर कुठं टेकायला म्हणून जागा नव्हती. दम घ्यायला फुरसद नव्हती. ' जी, जी ' म्हणण्यापलीकडे बिचाऱ्याला शब्दसुद्धां सुचत नव्हता. तर आतां काय सांगायचं !



अनुक्रमणिका






आणि अजून कलेक्टरसाहेब तरं यायचाच होता. एकटा नाहीं. त्याच्याबरोबर कंपनीचे दोन्ही मालक, एक गुजर आणि दुसरा लांडा. कायशीं नांवं होतीं त्यांची—बुदग्याला नीट आठवत नव्हतीं. आणि उपमंत्रीसाहेब वसंतरावजी सावंतसाहेब पण त्यांच्याबरोबर येणार होते. येतील बारापर्यंत. चारला समारंभ म्हणजे तोंपर्यंत यायलाच हवं......

बुदग्या महारानं तमाखू चोळत हें असं चऱ्हाट लावलं.

' समारंभ ? कसला ?' धर्म्यानं विचारलं.

' आतां हें सुद्धां मलाच विचार ! अरे, उद्‌घाटन नाहीं का आज ?'

' उद्‌घाटन—म्हणजे रे म्हारा ?'

' उद्‌घाटन म्हणजे–' बुदग्या मध्यंच थांबला. मुद्दामच. तमाखूची चिमूट सावकाश त्यानं तोंडांत टाकली. कडवट तोंडानं दाढेखालीं घोळवली आणि मग सांगितलं, ' भारी अवघड काम तें, काय ? फक्त मंत्र्यांनाच जमतं. हें नाहीं जमलं तर मुळीं सरकारांत घेणारच नाहींत. कायदाच आहे तसा.'

' देवबिव येत असेल अंगांत ?' धर्म्याचं कुतुहल जागं झालं:

' असेलसुद्धां म्हणजे काय आहेच. कारण उद्‌घाटनाच्या प्रसंगाला मंत्रीसाहेब भाषण पण करणार आहेत. आतां अंगांत वारं आल्याखेरीज माणूस व्याख्यान देण्याचा खुळेपणा करणार नाहीं आणि ऐकायला बसेल तरी कोण ? काय !' महारानं मत दिलं.

' मग सरळ तसं सांग कीं !' उशीरा का होईना, धर्म्या रुद्रेला उलगाडा होत होता.

' कसं ?'

' मंत्र्याच्या अंगांत वारं येतं त्याला उद्‌घाटन म्हणतात.'

' हळूं बोल धर्म्या, अरे बाबा हीं सरकारचीं बिंगं आहेत.' बुदग्या महारानं दटावलं, जसं कांहीं त्याला हें सगळं ठाऊक होतं. पण सरकारी नोकर पडला. आणि म्हणून या गोष्टी तो बोलूं शकत नव्हता.

पण मग एकदम आठवण झाल्यासारखं करून तो म्हणाला, ' निघतों, मी. बोलत बसेन आणि दवंडी राहून जाईल. तो गोळेसाहेब–'

' त्याचा कापला गळा. ' धर्म्या वस्कन ओरडला.

' झक् मारली आणि नांव काढलं. पण गांवाला वर्दी नाहीं दिली तर तो थेरडा भट बारावं घालून राहिल माझं. रातला मुद्दामहून आला. म्हणाला दवंडी जोरकस होऊं दे. समारंभाला उभं गांव लोटलं पाहिजे. जत्रेसारखं. हां.'

' म्हारड्या कां ऐकून घेतलंस त्याचं ? हा कोण सांगणार ? काय संबंध ?' धर्म्याचे प्रश्नावर प्रश्न.

'संबंध सगळाच. उपमंत्रीसाहेब करणार खरं, तरीसुद्धां उद्‌घाटन कंपनीच्या खाणीचंच कीं नाहीं ?' बुदग्यानं सगळा खुलासा केला.

' आं !' धर्म्या रुद्याची वाचा बसली.

' अरे आं काय ? चेष्टा नाहीं. सत्य गोष्ट. आणि हा गोळेसाहेब नुसता सांगूनच गेला नाहीं. दहाची एक नोट ठेवलीन हातावर. तर आतां सांग धर्म्या ऐकून घ्यायला नको ?'

महाराला तमाखू चढली होती. त्याची तंद्री पंचमांत होती. गडी तालांत होता. म्हणूनच त्याचा एरव्हीचा तोल सुटला होता.

त्याला सावध केलं धर्म्यानं. फसफसत फटाका उडावा तसा तो उसळला, 'चूतमारीच्या, ढोरं खाईल्व ! आणीक वर हे पैसे सा.

# बढे चलो चव्हाण !

हिमालयाच्या पावनशिखरीं भूतांचें थैमान
' लाल 'वृत्तिचा, कृष्णकृतीचा हा पिवळा सैतान
भाई बनला आज कसाई घोरांचा सुलतान
भारतियांच्या पुरुषार्थाला देत धीट आव्हान
हिमालयाहुनि उंच आमुचा मानदंड अभिमान
स्वीकारित आव्हान निघे हा–बढे चलो चव्हाण

शांत तपस्वी हिमालयाची येतां कानीं हाक
खवळुनि उठला सह्यकुलाचल असह्य डोळेझांक
कैलासाचा त्रिशूलधारी जागवि अवघे रान
डमडमडमरू गर्जूं लागे जागृत शिवसंतान
सह्याद्रीची सिंव्हगर्जितें निनादवी अस्मान
घेइ झेप हा वीर भारती–बढे चलो चव्हाण

महारुद्र बलिभद्र घेउनी स्कंधीं नांगरफाळ
आला कर्दनकाळ तुझा हा वृकासुरा सांभाळ
देशासाठीं धुरंधरातें रणमरणाचा छंद
मर्दायातें महिषासुर ये महाप्रतापी स्कंद
स्वातंत्र्यास्तव कर्तव्याचें हातीं घेत कृपाण
शिवरायाच्या वीरमराठ्या–बढे चलो चव्हाण

काळाकातळ धैर्य मेरु हा करुनि छातिचा कोट
राष्ट्ररक्षणा दंड ठोकुनी कसुनि लाललंगोट
बोवनबुरुजीं गडागडाचा प्रताप घे आकार
वीजेचा कल्लोळ झिमेला तरवारीची धार
घोरींनाही घोर लाविती पृथ्विराज चव्हाण
झेपावत हा सिंव्हछावा–बढे चलो चव्हाण

भाउपणाच्या मिठींत घेई तो प्राणांचा घोट
आंतर हेतू कळे फाडतां वाघनखांनीं पोट
षड्थास पाडील पालथा, रथीं निपुण रणवेद
गनिमीकावा पुरा जाणतो चक्रव्युहाचा भेद
धीर धोरणीं अभिमन्यूही सान असून महान
नवसेनानी वीरमराठा घेत सतीचें वाण
दख्खनचा हा सरजा तुमची उडवील दाणादाण
खिंडी खिंडी लढविल बाजी–बढे चलो चव्हाण

मूषक वाहन गजाननाचें तुजलागीं वरदान
महाराष्ट्राच्या पांचदेवींची मायापाखर जाण
उभा पाठिशी कुरबंडाया भारत पंचप्राण
गौरी शिखरीं फडकत राहो अमुचे राष्ट्रनिशाण
कोटि कोटि कंठांतुनि उमटे यशवन्तांचें गान
महाराष्ट्राच्या हे रणमर्दा–बढे चलो चव्हाण

—राजा बढे








माणसं खा. गांव खा. आणि सगळं खपलं कीं एक दिवस स्वतःलाचं खाऊन टाक. जा.'

खरं खोटं, नीति अनीति, मानापमान यासंबंधींच्या धर्म्याच्या जाणिवा अन् नेणिवा अशा अर्धवट न् गुंतागुंतीच्या होत्या कीं खुद्द त्यालाच ठावठिकाणा नव्हता. सहसा तो चिडत नसे आणि एकादवेळ असा चिडला कीं मग बेसुमार. कारण असलंच तर, त्याचं तो जाणे ! किंवा त्यालाही तें टाऊक नसायचं. एरव्हीचा कलंदर, लाचार अन् बेकार धर्म्या त्या क्षणीं स्वतःलाच विसरून जाई. कुठल्यातरी सुप्त अन् तप्त अशा आत्यंतिक संवेदनांनीं तो झपाटल्यासारखा होई. त्याला नकळत तो बदलून जाई. विचार आणि आवर हरकून वसे.

बुदग्या महाराच्या बोलण्यानं कुठंतरी त्याच्यांतील माणसाच्या जडावाला धक्का लागला. धर्म्यापाशीं बाकी कांहीं नव्हतं—फक्त तें आणि तितकच ! तेव्हां तो हल्ला, हादरला नसता तरच आश्चर्य !

पण महाराला धोरण आपलं बेताचं होतं. धर्म्या विघडलेला बघून तो खुष झाला. तोंडांत तमाखू. म्हणून हंसता येईना, बोलता येईना. तरीहि 'हूं हूं' करीत पारव्यासारखा माना हिसडून तो खिदळत होता.

तशीं धर्म्या रुद्राच्या रागाला एकाचीं दहा तोंडं फुटलीं आणि डोळा उरलाच नाहीं. बुदग्याच्या बेचाळीस पिढया असतील नसतील तिथून निघूं लागल्या. कोणाला अपस्मारी, कोणाला महामारी अशा एकेक साथीच्या बिमारीनं आचक्याउचक्या देत ही मंडळी धडाधड मरून पडूं लागली.—तोंडाला येईल तें धर्म्या भकत होता. आणि वेडा असा हाताला येईल तें उचलून महाराच्या अंगावर फेंकत होता.

महाराला काय तितकीच गंमत ! लोकांच्या हातचीं दगडं अन् धोंडे तर त्याच्या पांचवीला पुजले होते. ते चुकविण्यांतच हयात गेलेली. त्याच्या जातींत नाहींतरी हा खेळच झालेला असतो. धर्म्याला हुलकावण्या देत बुदग्या टुणटुण उडया मारीत होता. 'हः हः हाः हाः' खिंकाळत होता. ढोलावर थाप देऊन 'हां हां' करून धर्म्याला डिंवचत होता. सांगत होता, 'जीव घेणार होय रे माझा ? घे, घे ! हः हाः ही...'

अखेर दमला धर्म्याच. थकला, भागला अन् लोळागोळा अंग टाकून खालीं बसला. दम लागला, घाम निघाला आणि तसं त्याचं टेंपरेचर आपसुक खाली आलं. त्यानं माघार घेतली. तरीही धापा टाकीत तो फडफडला, 'म्हारामागं कोणी लागावं ? आं ! जा, दिला सोडून...'

घाटी चढून वर तळपीवर आलं कीं पहिलं वडाचं झाड लागे. या पुराण वटवृक्षाचं गांवांत लोकांना खूप कौतुक. मोठ्या प्रेमानं तीं गांवचीं छत्री असा त्याचा उल्लेख करीत.

आणि हा वृक्ष होताही तसाच. छत्रीसारखा डेरेदार. इतका प्रचंड आणि अगडबंब पसारा टोकून उभा होता कीं निम्मं शिम्मं गांव सहज त्याच्या सावलींत मावलं असतं. दिवसा गांवचीं पोरं गुरांना रानांत चरणीला सोडून वडाखालीं इस्पिकं किंवा सूरकोंडी खेळत बसत. रात्रीला महामायेची सारी चाळगत इथं वस्तीला उतरे.

आजसुद्धां बरींच पोरं वडाखालीं गर्दी करून होती. कुडवाळ्यांनीच नाहीं, तर बामणांची देखील. आणि हें मात्र अजब खरं ! ज्येष्ठांत सरत्या मंगळवारला अवशीचा याच वडाला वनदेवीच्या नांवानं बकरा ओपत आणि उकडा भात घालीत. तेव्हां नाहीं म्हणावयास बामणांची चार पोरं शेखी मिरवायला येतें. चाळगतीला भात आणि बकरा वाहिला कीं सरळ भाऊ कुळकर्ण्यांच्या घरची वाट धरत. त्या रात्रीं मग मागं वळून बघायचं नसतं. बघेल त्याला वडाखालं गोळा झालेल्या भूतावळीनं धरलंच म्हणून समजावं ! एकदां ज्येष्ठी मंगळवारचा हा कार्यक्रम उरकला कीं बामणांचीं पोरं जीं पाठ फिरवीत ती मग पुढील वर्षी याच निमित्तानं उगवत.

दुरून धर्म्यानं बंड्या नाबराचा आवाज ऐकला आणि वाटतं एकदाच त्यानं त्याच्याकडं बघितलं खात्री करून घेण्यासाठीं आणि मग त्यानं जी खालीं मान घातली ती वडापाशीं आला तरी उचलली नाहीं. खांद्यावर पाण्याची जड कावड हलकू हलकू तोलत तो तसाच पोरांच्या अंगावरून भीष्माच्या डोंगराकडे वळला.

पोरंपोरं जमून आपसांत कसलासा खेळ करीत होती. त्यांचा कांहींतरी मोठाच बेत चालला होता. सगळे एकापेक्षां एक शहाणे आणि म्हणून तोंडं वाजत होतीं. एकमत होत नव्हतं.

द्वारक्या कुळकर्ण्यानं धर्म्याला पाहिलं आणि तसं हटकलं,

'बरोबर दाजी दिसत नाहींत रे धर्म्या ?'

'नाहीं आले. म्हणाले, तूंच जा.' धर्म्यानं सांगितलं.

'अरे, दाजी पांघरूण घेऊन निजले असतील.' बंड्या नावरानं तोंड घातलं. 'आजचा दिवस उठणारच नाहींत. कां तें विचार कीं !'

'गप्प रे ! कां चेष्टा करतोस दाजींची ?' हा द्वारकानाथ बोलला. त्यानं बंड्याला दटावलं. कां कोण जाणे ! आजतरी दाजी नाबराचं त्याला भलतंच प्रेम आलं होतं. उमाळ्यानं त्यानं पुढं म्हटलं, 'पण यायला हवे होते दाजी. आशीर्वाद घेतला असता.'

म्हणजे द्वारक्याचं हें बोलणं धर्म्याला समजेना. हा भाऊ कुळकर्ण्यांचा लेकच बोलतो आहे कां कोणी दुसरा—त्याला प्रश्न पडला. प्रश्नार्थक चेहऱ्यानं आणि त्याहूनहि विस्मयानं तो द्वारक्याला न्याहाळत राहिला. वरपासून खालपर्यंत. पुन्हा न् पुन्हा.

अशांत द्वारकानाथनं त्याला दुसरा धक्का दिला. सांगितलन्, 'वाटच बघतो आहोंत तुझी, धर्म्या.'

'माझी. छाः ! कांहींतरीच, धन्यानूं.' धर्म्याचा कानावर विश्वास बसेना.

'धर्माचा अवतार तूं. म्हणून तर दाजींनीं सेक्रेटरी करून टाकला.' द्वारक्या कुळकर्ण्यानं भलावण सुरू केली.

धर्म्या फुलला, सुखावला. लाजेचं हाळकुंड उगाळत पुटपुटला, 'छाः छाः ! कसला हो शेक्रेटरी. भीष्मावर कलमांसाठीं दाजींनीं ते खड्डे मारून ठेवले आहेत. म्हणाले, धर्म्या नेमानं पाणी घाल रे. असा सांगकाम्या मी ! काय ? त्याच कामावर निघालों नव्हे.'

'आजचा दिवस राहूं दे पाणी.'

'छाः ! आणखी कांहीं सांगा. धन्यानूं, आतां तुम्ही सांगावं, मी नाहीं म्हणावं ही काय बरी गोष्ट झाली ?' धर्म्या चिचकत बोलला.

पण द्वारकानाथाचा पवित्रा बदलला होता. तो नुसताच गुंड नव्हता. हिकमतीसुद्धां होता. वेळ बघून बोलणं आणि काळ ओळखून चालणं त्याला बरं साधायचं. आतांसुद्धां त्यानं तोंड वाकडं केलं. आवाज खालीं खेचला. काकुळतीला आल्यासारखं तो गयावया करीत म्हणाला, म्हणजे 'जिरलीच म्हण कीं !'

...पान ४९ वर












ही गृहिणी सुखा-समाधानांत नांदते आहे. आपलीं सगळीं कामं ती कशी अगदीं आनंदानं करीत असते. भरल्या गोकुळाची ही यशोदा. आपल्या पतिराजांचा तिला अभिमान आहे, तसाच स्वत: बद्दलहि आहे.

## डेटमध्यें धुतलेल्या आपल्या कपड्यांबद्दलहि तिच्या मनांत विलक्षण आपुलकी असते.

अन कां असणार नाहीं? कपडे कसेबसे धुवून निघाले आहेत, असं डेटमुळें कधींच होत नाहीं...डेटमध्यें धुतलेले कपडे कसे अंतर्बाह्य स्वच्छ आणि उजळ निघतात!

*तुम्हींहि याच आधुनिक मार्गाचा अवलंब करा...डेटनें कपडे धुवा...त्यांचा अभिमान बाळगा. डेट—एक सिंथेटिक डिटर्जंट!*

**स्वस्तिक** ऑईल मिल्स लि. मुंबई १.

Shilpi SOM I-MAR

*'माणसानं कसं फुलासारखं प्रत्येक वस्तूला कसं नीट कीं...!' तशी ती लहान राहिली आणि मग जपानची ताजं अन् टवटवीत राहिलं पाहिजे. खोलीतल्या जपून ठेवलं आहे. रोज रात्रीं झोपतांना वाटतं मुलीसारखीं टाळ्या वाजवीत माझ्यापुढें उभी ती घटना ती सांगूं लागली.. ...*



कुठल्याही समारंभाला ती आली कीं नेहमीं पहिल्या रांगेंतल्या खुर्चीवरच बसे. तिचा हा नियमच होता. आजपर्यंत तिनं पुष्कळ नियम गुंडाळून ठेवले असतील पण ह्या नियमांचं मात्र अगदीं कसोशीनं पालन केलं होतं. जरासं निरखून पाहिलं तर तिच्या जवळ बहुधा एखादी प्रथितयश व्यक्ति हमखास बसलेली दिसेल. हाही एक नियमच होता कीं अपघात हें सांगता येणार नाहीं. पण कुठच्याही समारंभाला तिनं यायचं म्हणजे पहिल्या रांगेतली खुर्ची आणि एखादी प्रथितयश व्यक्ति ह्या दोन गोष्टी अगदीं आवश्यक होत्या एवढं खरं! तिचा थाटच तसा! नुसत्या पोशाखावरूनसुद्धां तिच्या सामाजिक श्रेष्ठतेची कल्पना येईल. उंच टांचेच्या सँडल्सचा (कारण ती म्हणे इंग्लंडांत जन्माला आली होती.) रंग साडीच्या रंगाशीं मिळता जुळता, जॉर्जेटची किंवा उंची नायलॉनची झगझगीत साडी, विनबाह्याचा ब्लाऊझ—बॉबकट—रेखलेल्या भुंवया–! ह्या साऱ्या रंगसंगतीला शोभणारी लिपस्टीक—! लाल रंगांतल्या अनेक छटांच्या लिपस्टीक्स् तिच्या संग्रही होत्या. ती कोणी सिनेनटी आहे असा भ्रम पहाणारांचा झाला असता. पण असं निरखून पहाणाराला तिच्या गळ्यांवर नुकत्याच पडूं लागलेल्या सुरकुत्या मध्येंच दिसत.

कोणच्याही उपायांनीं ह्या सुरकुत्या जात नव्हत्या, हा तिचा एक अनुभव! तरीहि उंच कॉलरच्या ब्लाऊझमध्यें ती त्या पद्धतशीरपणें लपवीत असे ही मात्र अगदीं सत्य गोष्ट होती. तशीं म्हातारपणाची तिला धास्ती नव्हती. कारण त्याच्याविरुद्ध तिचा अगदीं कडेकोट बंदोबस्त होता. स्त्री कधींच म्हातारी होत नाहीं हें तिच्याकडे पाहतांक्षणींच पटावं.

उलट वाढत्या वयाबरोबर स्त्री जास्तजास्तच तरुण होत असावी. सोळाव्या वर्षांतच ती जरा कमी स्वप्नाळू-अन् जास्तच व्यावहारिक असतें! कुठेंतरी ऐकलेलीं हीं गंमतीची वाक्यं—! कां कोण जाणें तिच्याकडे पाहिलं कीं हमखास आठवायचीच! वास्तविक ती आतां पन्नाशीच्या जवळपास आलेली! अर्थातच तिनं आपलं वय कधींच सांगितलेलं नव्हतं–पण—! तिच्या मोठ्या मुलाला पाहून तिचं वय सहज समजून यावं–! मुलगा नुकताच विलायतची वारी करून बॅरिस्टर होऊन आलेला–! एका खानदानी उच्च घराण्यांतल्या मुलीशीं लग्न झालेला–!

पण ती मात्र सासूसारखीं वाटत नसे—केव्हांही तिच्याकडे जा—स्वतःच्या रंगीबेरंगी पोशाख केलेल्या मुलींच्या बरोबर ती सुनेलाही मोठ्या कौतुकानं हांक मारीत असे. आलेल्या पाहुण्यांशीं मग त्या सर्वांची अम्दी ऐसपैस ओळख करून देत असे.

अँथांतचं सुनेचं खानदानी घेराणं पांहुण्याला त्या ओघांतच समजून चुके.

घरांत ती बहुतेक इंग्लीशच बोले. किंबहुना इंग्लीश बोलल्याशिवायं आपण कांहींतरी Seriously बोलतों आहोंत हें तिला पटतच नसे. तिच्या घरीं शहरांतल्या सर्व प्रतिष्ठित नामवंत स्त्री-पुरुषांची हजेरी एकदां तरी लागली असलीच पाहिजे, असं छातीठोकपणें सांगायला मुळींच हरकत नाहीं. पुष्कळदां मंत्रीही मेजवानीला येत. संध्याकाळच्यावेळीं तिच्या दिवाणखान्यांत बहुधा एखादा ब्रिजचा अड्डा किंवा कॅरम, केव्हां नुसत्याच गप्पा अगदीं उतूं जात. सारं वातावरण कसं हास्य-विनोदांत फुलून जाई! संध्याकाळ मात्र सातच्या पुढेंच-! दुपारी तो आलिशान दिवाणखाना अगदीं सामसूम-उजाड वाटे. कोचं, खुर्च्या, सॅटीनचें अभ्रे, पांघरून जणुं निमूट पडत.

मला तरी हें माहीत असण्याचं कारण म्हणजे एका दुपारीच तिनं मला Appointment दिली होती.

एवढ्या मोठ्या व्यक्तीला भेटण्या अगोदर फोन करून वेळ ठरवलीच पाहिजे म्हणून मी फोन केला. 'हॅलो' करून ती कृत्रिम उंच सुरांत जवळ जवळ किंचाळलीच-! तो 'हॅलो' घंटेसारखा कितीतरी वेळ हेलावत राहिला. अगदीं स्टायलिश हॅलो—! ऐकल्याबरोबर पुढें बोलण्याचीच भीति वाटूं लागली. अगदीं भीत-भीतच मी तिचा वेळ विचारला.

ती म्हणाली—त्याच कृत्रिम आवाजांत! 'थांबा हं-! डायरी बघतें!'

इतका कृत्रिम, तीव्र स्वर मोठ्या हौसेनं कां कमावण्यांत येतो हें गूढ मला अजून नीटसं उकललं नाहीं. एक हेतु मात्र स्पष्ट—ऐकणाराला आपला आवाज गोड वाटावा-!-

डायरी बघतें असं म्हणून तिनं पांच मिनिटं तरी घालवली असतील. दरम्यान फोन कानाला लावून चुळबूळ करीत बसण्याखेरीज मला दुसरं गत्यंतरच नव्हतं. मी कांहीं तरी विचार करीत होतें. पलीकडे काय चाललं असावं ह्याचे तर्क करीत ऐकत होते. पानं उलटण्याचे आवाज येत होते. म्हणजे बरीच मोठी डायरी असली पाहिजे; मध्येंच रस्त्यावरचे आवाज, कुत्र्यांचे भुंकण्याचे आवाज-!

शेवटीं तिनं एकदाचा फोन उचलल्याचा आवाज झाला. पुन्हां तितकाच लांब, तोंड भरून बोललेला हॅलो—!

मग ती अजीजीनं बोलूं लागली.

'Sorry हं—! मी फिनई संध्याकाळीं जरा Busy आहे. रात्रीं पार्टी, संध्याकाळीं फॅशन शो...! तुम्ही असं करता! दुपारीच या ना चहाला! पंधरावीस मिनिटं तरी बोलता येईल आपल्याला-! पण काम सांगितलं नाहींत तुमचं—!'

'काम, तसं विशेष कांहींच नाहीं!'

'कांहींच नाहीं...'

'हं हं...!' मी चांचरत उत्तर देऊं लागलें. 'सांगूच कां...! पण—

कसं सांगू!'

'म्हणजे काय!' ती जरा आश्चर्यानं पण तुटकपणं म्हणाली. कांहींच काम नसतांना तिच्यासारखीला फोन तरी करण्याचं धाडस मला कसं व्हावं असा भाव त्यांत निश्चित होता.

मी अडखळतच म्हटलं,

—इदु साक्रीकर

'नाहीं तसं नाहीं...! एकदां आपली ओळख झाली आहे, आतां जरा जास्त करून घ्यायची आहे. थोडक्यांत तुम्हांला जरा बघायचं आहे असं म्हणा ना-!'

'कमालच करता कीं हो तुम्ही!' मोठ्यांदा खिदळत ती म्हणाली. हें बोलतांना तिनं बहुतेक नको नकोचा लाडिक अभिनय केला असावा.

'म्हणजे काय! मला पाहुला मी काय सोळा वर्षांची पोर आहे!'

तिच्या मनसोक्त हंसण्यानं आतां टेलिफोन सुद्धां भरून गेला.

'सोळा वर्षांच्या नसाल पण सदा सोळा वर्षांच्या दिसण्याचं रहस्य तरी निदान तुमच्या-जवळ सांपडायला काय हरकत आहे!' ह्या माझ्या वाक्याबरोबर पुन्हां एकदां पलीकडून हास्याची फेर झडली. मघाच्या हंसण्यांत स्वतःची चेष्टा करण्याचा जाणूनबुजून प्रयत्न—! स्वतःची अशी चेष्टा केल्यावर निदान ऐकणाऱ्यांनीं तरी स्तुति करावी! आतांच्या हंसण्यांत मात्र मनापासून पाहिजे असलेले मिळाल्याची जाणीव...कृतार्थता...! आणि मग तिनं अगदीं भारावून लगेच सांगूनही टाकलं, 'तुम्हीं केव्हांही या! घर तुमचेंच आहे. आज संध्याकाळीं येता कां जेवायला!'

शेवटीं मी दुपारी जाण्याचं कबूल केलं. आणि त्या निःशब्द-शांत वातावरणांत प्रवेश केला तेव्हां क्षणभर पांढरी रात्र पाहिल्याचा भास झाला. मोठाल्या खिडक्यांवर टाकलेले जमिनीपर्यंत लोंबणारे फिकट हिरव्या रंगाचे पडदे खाली मान घालून उभे राहिल्यासारखे उंच स्टॅंडचे दिवे—! बंद कांचेच्या कपाटांत ठेवावा तसा तो दिवाणखाना दिसत होता.

शेजारच्याच कोचावर मी अंग टेकलं. दार उघडायला आलेल्या गड्यानं भरभर खिडकीवरचे पडदे दूर सारले आणि मोठ्या रुबाबांत हातांत एक लिहायचं पॅड आणि पेन्सिल घेऊन माझ्या जवळ उभा राहिला. वर अदबीनं पंखा सुरू झाला होता. मी आश्चर्यानं एकदां त्याच्याकडे पाहिलं. अगदीं मठ्ठपणें त्यानं माझ्या हातांत ते पॅड दिलं. त्यावर माझं नांव लिहिल्यावांचून आतां गत्यंतर नव्हतं. एकूण ऑफिसमधील पद्धत तिनं घरीही कायम ठेवली होती. भेटा-यच्या आधीं नांव पाठवलं पाहिजे आंत! वजनाच्या यंत्रांत दहा पैसे टाकताच वजन आणि भविष्य लिहिलेलं कार्ड खटकन वर येतं-तसं माझं नांव आंत जातांच ती तत्परतेनं पुढें आली. ताठरपणें पण कृत्रिम लचकत—खोटं हंसत-! मला शेकहॅंड करीत ती खांदे उडवीत म्हणाली, 'Glad to meet you'.

मग एखाद्या हॉटेलांत जाऊन बसल्यावर ऑर्डर द्यावी तशी तिनं चहाची ऑर्डर दिली. आणि चहा येईपर्यंत मुंबईच्या बदलत्या हवा-मानावर अगदीं गंभीर मुद्रेनं चर्चा सुरू झाली. हलक्या फुलक्या विषयाची गंभीर चर्चा, आणि गंभीर विषयावर हलक्या फुलक्या गप्पा-ही फॅशन तिनंही आत्मसात केली होती. चहा येईपर्यंत तिचं तें हवेवरचं गंभीर भाष्य ऐकून मला एखादी हवामान पत्रिका सद्गतित कंठानं वांचल्याचा भास झाला.

चहा आला-त्याबरोबर सुंदर कपबशांचं प्रदर्शन मांडल्यासारखं वाटलं. चहा पिण्यापेक्षां त्या कपबशांकडेच बघत बसावं असं मला वाटूं लागलं. माझ्याकडे एकदां हंसत कटाक्ष टाकीत तिनं त्या कपबशांचा इतिहास सांगायला सुरवात केली.

'दोन वर्षांपूर्वीं जपानला गेले होते-तेव्हां आणली थोडीशी कोकरी!' असोनिळ कप

घरांकडे ती टक लावून पहात बसली. हातांत एक प्लेट घेऊन उगीचंच वांकडी तिकडी करून पहात ती म्हणाली—

' एकेक दिवस एकेक देशाचा असतो, माझा—! '

' म्हणजे ! '

' म्हणजे असं कीं, जगांतल्या जितक्या म्हणून देशांत मी जाऊन आले तियली आठवण करावी हा त्यांतला हेतु ! एक दिवस चायनाहून आणलेल्या सर्व वस्तूंनीं घराची सजावट करायची–दुसऱ्या दिवशीं इंग्लंडहून आणलेल्या वस्तूंनीं–असं—!'

' आज चीनचा वार वाटतं–' असं मी विचारतांच ती खुदकन हंसली आणि मग स्वप्नांत तरळल्यासारखीं बोलूं लागली.

' आतांपर्यंत बहुतेक सर्व देश पहाण्याचं भाग्य मला लाभलं आहे.–' परवाच मी जपानला सुद्धां जाऊन आले ! '

' अरे वा–! मग कसा काय वाटला तुम्हांला जपान ! '

' Wonderful ! अप्रतिम...किती आवडला हें कसं सांगूं नि कुठल्या शब्दांत सांगूं तुम्हांला ! एकच सांगतें–माझ्या दोन मुलींची अजून लग्नं व्हायचीं आहेत. माझ्या भावी जांवयांना माझी अगदीं Standing offer आहे...! हुंडा देणार नाहीं पण स्वखर्चानं माझ्या मुलींना हनीमूनसाठीं जपानमध्येंच पाठवीन...! म्हणजे हें अगदीं खरं हं...! चेष्टा नाहीं—! ' ती मोठ्यांदा हंसूं लागली. कांहींतरी वात्रट बोलण्याचा मोह मला अनिवार झाला. पण महतप्रयासानं मी तो आवरीत तिच्या हंसण्यांत सूर मिळवला.

अशीं बराच वेळ आमचीं अनेक विषयांवर बोलणीं झालीं. गप्पांत सगळे देश फिरून आल्यानंतर लाजेकाजेस्तव तरी तिला स्वतःच्या भाषेची आठवण झाली असावी. तेव्हां ती मोठा आविर्भाव आणून म्हणाली, ' आमच्या घरांत पहिल्यापासूनच सारं वातावरण फॉरीन-' मला तर मराठी पेपर सुद्धां बघायला मिळत नाहींत. अन् इतक्या दिवसांत एखादं मराठी नाटक किंवा सिनेमा पहायला असेल तर शपथ–!'

शेवटीं अगदीं जातांना ती मोठ्या अजीजीनं सांगूं लागली, 'माफ करा हं...! मला तुम्हांला माझं सारं घर दाखवायचं आहे पण एक खोली सोडून !' मी कांहींच बोललें नाहीं. नुसतं आश्चर्यानं पाहिलं.

' म्हणजे त्याचं असं आहे कीं माझ्या एका मुलीचा पाय काल जरा मुरगळल्यासारखा झाला आहे. काल डॉक्टर आले होते. त्यांनीं तिला Complete Rest घ्यायला सांगितली आहे तेव्हां तिला मी disturb करणार नाहीं. कांही हरकत नाहीं ना तुमची...!'

ती एकदम उठून उभी राहिली. मीही तिच्या मागोमाग चालूं लागले. दोन–तीन दालनं आम्ही ओलांडलीं. एकेक दालनाचं–तिथें ठेवलेल्या Curio चं, भिंतीवर लावलेल्या प्रसिद्ध चित्रांचं, आईवडलांच्या फोटोंचं तसंच इतर नातेवाईकांचं ती अगदीं रसभरीत वर्णन करीत ठुमकत पुढें चालली होती. एखादी Documentary पहावी तसंच मला वाटत होतं. शेवटीं सहाव्या मजल्याच्या विस्तीर्ण गच्चीवर येऊन आम्ही उभें राहिलों. सहज दोनशें माणसं बसूं शकतील एवढी मोठी गच्ची, आणि पलीकडे एकच एक प्रशस्त खोली—!'

ती ऐटींत म्हणाली, पांचवा अन् सहावा हे दोन Floors आमच्यासाठीं–! बाकी सारे भाड्यानं देऊन टाकले आहेत–!"

तिच्या बोलण्याकडे माझं विशेष लक्ष नव्हतंच–! त्या सुंदर शुभ्र गच्चीचं सौंदर्य न्याहाळण्यांतच मी गर्क होते. जागजागी बोगनव्हिला नजर अडवीत होता. गच्चीवर बसायची बाकं त्याच रंगाची, दर्शनी भिंतीवरच्या मोठाल्या पुष्पपात्रासारख्या दिसणाऱ्या कुंड्या त्याच दगडाच्या–! पण दगडांचं आस्तित्व सुद्धां इथें कुठें भासत नव्हतं. सभोंवताली पसरलेली विविध रंगांचीं फुलं पाहून दगडही विरघळून गेला असावा. मी पहात राहिलें. एखाद्या बागेंत गेल्यासारखं प्रसन्न वाटत होतं. ती सुद्धां भारावून बोलत होती.

' तुम्हांला माहीत आहे–!–जपानला जाऊन आल्यानंतर ह्या अशा बागेची कल्पना माझ्या डोक्यांत आली. जपानचं मुळीं वैशिष्ट्यच हें कीं टेरेसवर बाग करायची !

तो समुद्र—ही बाग—अगदीं ॲटमीला आल्यासारखं वाटतं इथें उभं राहिलं कीं—!

जपानमधलं ॲटमी असंच फार सुंदर आहे. रात्रीं पहावं म्हणजे वाटतं ॲटमी जणुं समुद्रावर कागदी दिव्यांसारखीं तरंगते आहे–!'

बराच वेळ स्तब्धतेंत गेला. समोर शिंपलीसारख्या दिसणाऱ्या समुद्राकडे पहात आकाशही तटस्थ होतं. सावकाश खालीं उतरणाऱ्या संध्येची चाहूल चांगलीच जाणवत होती. माझ्याच विचारांत मी बुडून गेले होते. पण ती एकदम विचित्र, हंसत माझ्याजवळ आली आणि माझ्या खांद्यावर एक चापट मारीत म्हणाली, ' हं ती पहा–! ती माझी बेडरूम–!'

बेडरूम म्हणजे दिवाणखान्यापेक्षांही एक प्रशस्त हॉल होता. समुद्राच्या बाजूला असणाऱ्या खिडक्यांजवळ दोन विस्तीर्ण अलिशान पलंग एकमेकांना जोडून ठेवलेले–चार कोपऱ्यांत सबंध आरशांचीं ड्रेसिंग टेबलं–सभोंताली मखमली कोचं, खुर्च्या, मध्यभागीं टांगलेलं कमळाचं झुंबर—!

तिच्या बेडरूमकडे एकदां पाहून मी जायला निघाले. खूपच वेळ झाला होता. अन् तिच्या रटाळ बडबडीचाही मला कंटाळा आला होता.

पण इतक्या लवकर मी जावं अशी तिची इच्छा दिसेना. दारांतून परतवून तिनं एका कोचांत मला जबरदस्तीनं बसवलं आणि ती मोठ्या रंगांत येऊन सांगूं लागली.

' जगाच्या पाठीवर कुठेंही जा–' इथल्यासारखी शांत झोंप मला कुठेंही येत नाहीं. आतां माझ्या मिस्टरांना जाऊन दहा वर्षे झाली असतील. पण मी इथेंच अगदीं एकटी झोपतें. कुणाची सोबत मला मुळींच आवडत नाहीं. एकटेपणांतहि एकप्रकारची मौज असते नाहीं–! ' थोडा वेळ थांबून ती पुन्हां म्हणाली—' कित्येक माणसं मला म्हणतात–म्हणे मी widow सारखीं दिसत नाहीं. काय म्हणून widow सारखं रहावं हो–' मला कुंकूं आवडतं— मी लावतें–! माणसानं कसं फुलासारखं ताजं अन् टवटवीत रहायलं पाहिजे. ह्या खोलींतल्या प्रत्येक वस्तूला मी अगदीं जसंच्या तसं ठेवलं आहे. रोज रात्रीं झोपतांना वाटतं मी जणुं आजच लग्न करून इथें प्रवेश करते आहे !'

मी त्रासल्याचा चेहरा केला तरी तिची बडबड चालूच होती. पुन्हां एकदां उठायचा प्रयत्न केला तेव्हां ती टाळ्या वाजवीत एखाद्या लहान मुलीसारखी नाचत माझ्यापुढें उभी राहिली.

' बरं कां ! मी जपानमध्यें होते तेव्हांची गोष्ट–! कुठल्याशा एका कॉन्फरन्सचं निमित्त काढून मी जपानला गेलें होतें. ॲटमीमधल्या दोन तीन हॉटेलमध्यें आम्हां सर्व प्रतिनिधींची सोय केली होती. मी म्हटलं मला अगदीं समुद्राजवळचं हॉटेल पाहिजे. सांगितल्याप्रमाणें माझी सारी व्यवस्था होईल अशी खात्रीच होती. मी आपली माझा नंबर घेऊन गेलें. पहाते तो, मला दिलेल्या त्या First Floor वरच्या खोलींत आणखीं दोन–तीन स्त्री–प्रति-

निधी. मला धक्काच बसला. तरातरा मी Receptionist जवळ गेलें आणि त्याची अशी कांहीं हजेरी काढली म्हणता. त्याला नीट इंग्लीश समजत नव्हतं. तो आपला वेड्यासारखा माझ्या तोंडाकडे पहात बसलेला अन् मी ओरडते आहे—अगदीं कंठशोष करते आहे कीं मला सहाव्या Floor वर समुद्राच्या बाजूची खोली फक्त एकटीसाटींच पाहिजे आहे. मला संवय नाहीं असली. खरं आहे कीं नाहीं सांगा—ज्याला आयुष्यांत सारं कांहीं First class मिळालं आहे—आणि तशीं संवय झाली आहे, त्याला एक दिवस तरी असला गोंधळ चालेल कां--!

त्यावेळीं रात्रीं दहाची वेळ होती. तरी मी एकसारखीं भांडत राहिले. माझ्या भोंवतीं हा घोळका जमा झाला. जपानी स्त्री-पुरुषांचा! सगळेच मठ्ठ, मुर्दाड चेहेरे—! एकाला मी बोलतें तें समजेल तर शपथ! मनांत म्हटलं, एवढी जपाननं प्रगति केली, त्यांना एक इंग्लिश भाषा कां शिकतां येऊं नये! शेवटीं एक अमेरिकन प्रतिनिधी घाईघाईनं घोळक्यांतून वाट काढीत माझ्याजवळ आला. माझं काय म्हणणं आहे हें त्यानं मोठ्या काळजीपूर्वक समजावून घेतलं. स्त्री—दाक्षिण्य दाखवावं पाश्चात्यांनीच. सुदैवानं त्याला जपानी येत होतं. त्यांनीं Explain केलं तेव्हां कुठें मला कळलं कीं सारी हॅाटेलं पुरी भरली आहेत इथली! तेव्हां मोठाच प्रश्न निर्माण झाला. मी अगदीं काकुळतीला आलेली पाहताच त्या अमेरिकन प्रतिनिधीनंच Suggest केलं—Receptionist होता तसाच निर्विकार चेहरा करून बसला होता. त्या अमेरिकन प्रतिनिधीनं हलक्या सुरात विचारलं—मॅडम तुम्हांला चालेल कां असं! मी ज्या हॅाटेलात खोली घेतली आहे त्याच्या शेजारची एक खोली अगदीं रिकामी आहे—पण—!'

'पण काय!' मी उत्सुकतेनं विचारलं—

'पण त्या दोन्हीं खोल्याचा व्हराडा कॅामन आहे! —चालेल!—खोली मात्र सुंदर आहे. सहाव्या मजल्यावरची—समुद्राच्या अगदीं जवळची!'

मी तात्काळ होकार दिला. माझं सर्व सामान त्या हॅाटेलांत नेण्यात आलं. मोठ्या अधिरतेनं मी त्याच्याबरोबर लिफ्टमधून वर गेले. आधाशासारखी खोलीच्या बंद खिडक्या—दारं उघडून समुद्र पहाण्याचा प्रयत्न करूं लागलें. पण काय आश्चर्य—समुद्र मला कुठें दिसेनाच!'

'म्हणजे—!' मी विचारलं.



'हे जपानी लोक म्हणजे फारच विलक्षण बघा. आमचं हें हॅाटेल म्हणे Rotating होतं. स्वतःभोंवतीं हळूहळूं फिरणारं!'

'म्हणजे काय।'

'तर काय! सारा अजबच प्रकार—! सुखाला चिकटून दुःख आहे, पृथ्वी फिरते आहे हें सगळ्यांनाच माहीत आहे. त्याची इतक्या अट्टाहासानं जाणीव करून द्यायचं काय अडलं होतं ह्या जपान्यांचं Sodists (सॅडीस्टस्) मेले! मी आपली खोलीचं दार उघडून गॅलरींत वेड्यासारखीं उभी होते. तो अमेरिकनही तिकडे पलीकडे उभा होता. जरा वेळानं तोच हंसून म्हणाला,

'मॅडम, तुम्हीं जेव्हां कडाडून भांडत होता तेव्हां ह्या खोलीची बाजू समुद्राकडे असली पाहिजे. नुकतीच बाजू फिरली आहे! इकडे पहा, ह्या गॅलरींत आलात तर डाव्या बाजूला समुद्र दिसेल—'

ती बोलत राहिली—अगदीं पाऊस पडल्यासारखीं—! आणि त्या भरतीच्या लाटांनीं ओलेचिंब होत मी गुदमरून गेले होते. आणि म्हणूनच की काय ती खोली सुद्धां अगदीं संथपणें फिरत असल्याचा मला एकसारखा भास होत होता.

# गीतेच्या  मुख्यार्थाची कैफियत

—अशोक अकलूजकर

*गीतेच्या मुख्यार्थाचें खरें आकळून अजूनही कित्येक मोठमोठ्या पांडित्य पंडितांना झालें नाहीं, असें निक्षून सांगणारा हा पहिलाच आधुनिक लेख! म्हणूनच लेखकानें अगदीं अत्याधुनिक व फारच मिस्कील पद्धतीनें या मुख्यार्थाचें 'ऑपरेशन' केलें आहे,.. अवश्य वाचा...*

**लहानपणापासून** आमचे मित्र आम्ही संशोधन क्षेत्रांत नांव काढणार, असें म्हणत असत. त्यामुळें निदान त्यांची बत्तिशी खरी करण्याकरिता तरी, आपण संशोधन करावयास हवें, असें आम्हांस फार वाटूं लागलें. परंतु संशोधनासाठीं कोणता विषय निवडावा याचा बरीच वर्षे निश्चय न करता आल्यानें, प्रज्ञा, प्रतिभा आणि पाण्डित्य असून देखील आम्ही सुस्त रेड्याप्रमाणें स्वस्थ होतो. सुमारें एक तपापूर्वी मात्र आम्ही, पूर्वीचा गाढ व्यासंग असूनहि एका नव्या दृष्टीनें गीतेवर हल्ला चढविला आणि महाराष्ट्रसारस्वतांत अक्षरवाङ्मयाची अक्षरशः चुमडीच्या चुमडी सोडली. आज त्यापैकीं एका चुमड्यातून आमच्या साऱ्या गीता तपश्चर्येचें जणूं गोमटें फलच बाहेर काढून आम्ही तें आपल्यासारख्या रसिकशुकांच्या मुखीं भरवणार आहोंत.

गीतेचें तात्पर्य काय, या विषयावर जेवढें वादंग माजलें आहे तेवढें नवकथा जगवावी का गाडून टाकावी, कीं ती आपल्याच मरणानें मरणार आहे का कुणाच्या, यावर देखील माजलेलें नाहीं. एकवेळ सर्व जगातील सर्व विद्वान् कालिदासाच्या काळाविषयीं एकमेकांचीं डोकीं एकत्र आपटून विद्युज्ज्वाला निर्माण करणार नाहींत; कदाचित् शेक्सपीअर हा मॉर्लो कीं मॉर्लो हा सेक्सपीअर, कीं शेक्सपीअर हा शेक्सपीअर आणि मॉर्लो हा मॉर्लो या प्रश्नाचा सर्वमान्य निकाल लागेल; किंवा दैवयोगानें या खेपेचा भारतीय क्रिकेट संघाचा कप्तान् हा दुसऱ्या खेपेस संघांत दिसेल पण गीतेच्या मुख्यार्थाबाबत विद्वान् एकमुखानें बोलणार नाहींत कीं एकवाक्यता दाखवणार नाहींत. बघावें तर प्रत्येकाचें तोंड वेगळ्या दिशेला. शंकराचार्य म्हणतात, 'सगळ्या कर्मांचा पार कम्प्लिट संन्यास पाहिजे.' तर रामानुजाचार्य म्हणतात, 'छयाः, कर्मांचा संन्यास करण्याची काडीमात्रहि गरज नाहीं.' (ईश्वराची भक्ति केली म्हणजे सारं कांहीं आपसुक होतें) आणि टिळक म्हणतात, 'या दोघांना गीता मुळीं कळलेलीच नाहीं. तिचं रहस्य मुळीं त्यांना गवसलंच नाहीं. कर्मसंन्यास तर नकोच, पण टाळमृदुंगांच्या नादांत चन्द्रभागेच्या तीरीं बृहन्नडेप्रमाणें नृत्यहि करावयास नको. ती जी तेवढी कर्मफलाशा आहे ना, तेवढी टाकली म्हणजे काम फत्ते झालें बघा.'

आतां काय या व्याख्याकारांच्या पुढें हात टेकायचें आणि डोकें थडाथडा आपटून घ्यायचें? अरे हें काय चाललंय, काय? कां करतां आहांत बिचाऱ्या गीतेची अशी कुतरओढ आणि ससेहोलपट? तिची अशी दयनीय दशा पाहून आमच्या हृदयाचें पाणी पाणी होतें. हें पोलादी मन लोण्याहून मऊ होतें. आमचा कण्ठ दाटून येतो. शब्द जड होतात. 'माऊली, काय ही तुझी दशा,' असा आम्ही आजुबाजूस कोणी नाहीं, असें पाहून टाहोहि फोडतो. 'कोठून ग्यां सारथ्यानं घोडचूक केली आणि या शिंच्या मानवांना गीता सांगितली', असें मनांत धरून, आपले अश्रु सर्व दशा ठीक असणाऱ्या पीतांबराच्या टोकानें पुसणारा तो परमकारुणिक नन्दनन्दन आमच्या डोळ्यासमोर येतो. "मला बैलोबाला काय अकाबाय आठवली, अन् ग्या त्या किसन्याला 'अरं मी ह्यास्नी मारूं का नगं,' येवडा शिंपल परस्न केला", असें वाटून वारंवार उसासे टाकणारा, मुठमुठ डोळे सुजलेला आणि जवळच फतकल मारून बसलेल्या द्रौपदीला, 'ए सटवे, तूं नगं मला शेनपना दावूं. गुमानं भांडी घासं' असं बजावणारा तो धनुर्धर धनंजयहि आमच्या नेत्रकमलांसमोर साकार होतो. मग मात्र आमच्या दुःखास सीमा रहात नाहीं. आम्हांस अगदीं भडभडून येतें. छाती फोडून आमचा शोक बाहेर येतो आणि हुंदक्यामागून हुंदके दाटून येऊं लागतात. फार, फार म्हणजे अगदीं फारच हाल चालवले आहेत हो या टीकाकारांनीं गीतामाऊलीचे!

यावर कोणी विचारील, 'अहो मग तुम्ही कां नाहीं थांबवत ते हाल? गीतेचें खरें तात्पर्य सांगा आणि बसवा कीं या साऱ्या टीकाकारांना गप्प.'

'वत्सा, अगदीं बरोबर आहे. आपल्या अल्प मतीनुसार सांगणारच आहोंत गीतेचा अर्थ आम्ही. त्यासाठींच तर आज आम्ही आमच्या यशोधवल लेखणींत पुनश्च शाई भरून तिला कृष्णमुख केली आहे. पहा आतां इतर टीकाकार आपापलें तोंड कसें काळें करतात तें. सावध हो. सज्ज हो. तयार रहा. कानाला नटीच्या प्रसिद्धीची विशालता दे आणि बुद्धीला देवआनंदच्या केसाच्या फुग्याइतकी उंच कर. मेढा गावीं पंढरपूरच्या

अनुक्रमणिका

विटाँआजवळ दिसताच जी 'धाचःपरमद्भुतम्' अवस्था होईल तीच तुझी अवस्था होणार आहे. धीर धर. स्वतःला सांभाळ. काय सांगतो त्याकडे जिवाचे कान करून लक्ष दे. सदैव त्याचेंच श्रवण, मनन, निदिध्यासन कर. तुझ्या मनाच्या गाभाऱ्यांत सर्वत्र सदैव सर्वथा याच वाक्याचा अमर प्रतिध्वनि उमटूं दे. ऐक, बाळा, पूर्वग्रह सोडून हा गीतार्थ ऐक. आमच्या प्रज्ञेवर हवाला टाकून ही गीतेची शिकवण ऐक. जुन्या जुनाट टीकाकारांना क्षणभर अडगळीच्या खोलींत कोंडून ठेवून हें गीतेचें तात्पर्य ऐक. 'एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ...' गीतेमध्यें मुख्यत्वानें ब्राह्मी तेलाचा फॉर्म्युला सांगितला आहे! ब्राह्मी तेल कसें तयार करावयाचें तें सांगितलें आहे !!

आतां तुला बसलेला ४४० व्होल्टस्‌चा धक्का ओसरला आहे आणि खुर्चीवरून विस्मयानें ताडकन् उडालेला तूं ॲसेंब्लीच्या मेंबरागत पुनश्च 'येन केन प्रकारेण' जागा पटकावली आहेस, असें आम्हीं समजतों. आतां आमचें काम आपलें म्हणणें सिद्ध करणें, इतरांचीं मतें खोडून काढणें आणि आमच्या मनावर येणाऱ्या कांहीं विशिष्ट शंकांचें समाधान करणें, हें आहे. तें क्रमशः उरकतों.

गीतेचा उपक्रम आणि उपसंहार हे तात्पर्याशीं सर्वथा जुळतात. पंडितहो, गीतेची प्रवृत्ति कशासाठीं झाली आहे? अर्जुनाचा शोक-मोह, अस्वस्थता अथवा थोडक्यांत आणि तुमच्या आमच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे अर्जुनाची घेरी घालविण्यासाठीं आतां व्यवहारांत आपण एखाद्या माणसास मूर्च्छा, घेरी आली म्हणजे काय करतों? कांहीतरी कांदा वगैरे त्याच्या नाकाशीं धरतों. तेव्हां गीतेंतहि भगवंतांनी मूर्च्छित अर्जुनाला ब्राह्मी-तेलाचीच ट्रीटमेंट दिली, यांत विसंगत असें कांहींच नाहीं; उलट सारेंच सुसंगत आहे. पुनश्च या ट्रीटमेंटचा परिणाम अर्जुनावर किती एक्सप्रेस झाला. पहा. त्याची सारी मूर्च्छा चुटकीसरशी पळाली. गीतेच्या तासाला शिक्षकानीं एखादा शब्द जोरांत उच्चारतांच मागील बाकावर मित्रांनीं पाठीशी घातल्यानें सुखानें साखरझोप चाखणारा कोणी गरीब बिचारा महाभाग धास्तावून क्षणार्धांत टक्क जागा व्हावा, अथवा मानसशास्त्राच्या पेपरांत ३३ गुण पडलेले पाहून—म्हणजे स्वर्ग दोन बोटें उरलेला पाहून—एखाद्या महोदयाचीं पर्दुल्या- इंद्रियांची सर्व सुखस्वप्नें डोळ्यांदेखत घर-गळून जावींत, किंवा नागरिकशास्त्राच्या उत्तर-पत्रिकेंत अमेरिकेची घटना आपण इंग्लंडच्या डोक्यावर मारली हें ध्यानांत येऊन एखाद्या महाशयाला बहुत लाज वाटावी, तसं कांहींसें त्याचें झालें. त्याच्या डोळ्यासमोरच्या सूर्य, चंद्र, तारका, काजवे आदि कवींनीं पसापसा वर्णिलेल्या गोष्टी, सरकारी ऑफिसांत टेबलावर ठेवलेलें वजन तेथील जनतासेवकाच्या खिशांत जसें पहातां पहातां एखाद्या सिद्ध पुरुषाप्रमाणें अंतर्धान पावावें, तशा एका निमिषार्धांत विनाश पावल्या. ब्राह्मी तेलाचे कण धरणाच्या पाण्यांत सरकारी पैसा जावा त्याप्रमाणें त्याच्या केसांपासून नखांपर्यंत गेले. तो सावधान झाला. हें 'जिंदा तिलिस्मात्' औषध सांगणारा श्रीकृष्ण म्हणजे 'श्रीकृष्ण फार्मसी' तर नव्हे ना, असा विकल्प त्याच्या मनाला कोपरखळी देऊन गेला. 'हें ब्राह्मी तेल सांडू ब्रदर्सचें कीं रामतीर्थ क्र. १' यासारखे सूक्ष्म प्रश्न तो विचारूं लागला आणि द्रोणभीष्मादींना उद्देशून 'आतां या तर पुढं, तुमच्या हाडाच्या भुकटीनं द्रौपदीला भांडीं नाहीं घासायला लावली तर नांवाचा अर्जुनच नव्हे' अशा भीमगर्जना तो करूं लागला. थोडक्यांत, गीतेचा उपक्रम आणि उपसंहार आम्ही काढलेल्या तिच्या तात्पर्याशीं सर्वथा जुळणारेच आहेत.

एवढेंच नव्हे तर ते इतर कोणीहि काढलेल्या गीतातात्पर्याशीं पूर्णपणें विसंगत आहेत, काडी-मात्रहि जुळणारे नाहींत.

कृपा करून विद्वानांनो, आम्ही इतर टीकाकारांना किस झाडकी पत्ती लेखतों असें समजूं नये. त्यांची गीतेव्यतिरिक्त ठिकाणची कामगिरी आम्हांस शिरसावंद्यच आहे. तथापि ज्यावेळीं आम्ही केवळ सत्य जनतेपुढें यावें म्हणून बद्धपरिकर झालेले असतों त्यावेळीं त्या महात्म्यांशीं देखील कोणतीहि तडजोड करण्यास आम्ही तयार नसतों. तत्त्वज्ञानाचा सौदा करणं आम्हांला कधीं जमलं नाहीं आणि जमेलसें वाटतहि नाहीं. नव्हे, आमची ती प्रकृतीच नव्हे.

असो. शंकराचार्यांच्या दृष्टीनें गीतेचें प्रतिपाद्य काय, तर कर्मसंन्यास हवा. आतां तुम्हीच सांगा, एकीकडे 'अर्जुना, तूं बेशक युद्ध कर' असें म्हणावयाचें आणि दुसरीकडे 'अर्जुना, तूं आपला झटकन् हातीं कटोरा घे; पटकन् गांडीवाची दोरी सोडून त्याचा दंड कर, झटपट भगवीं वस्त्रें अंगावर घे आणि पुनश्च दुसरी सुभद्रा आणूं नको म्हणजे झालें,' असें म्हणावयाचें यांत कांहींतरी संगति आहे. का? 'सिलोनला बुधवारची बिनाका ऐकून श्रवण-भक्ति कर आणि त्याचवेळीं दिल्लीला जें शास्त्रीय संगीत असतें ना, तें चुकवत जाऊं नको, असें म्हणण्यासारखेंच आहे हें! बरें, आचार्यांना कर्मसंन्यास करूनहि अर्जुनानें एवढें एक युद्धाचें कर्म करावयास हरकत नाहीं, असा वदतोव्याघात स्वीकारावयाचा असेल तर मग ते, 'त्या हॉस्टेलच्या मेसचें पुन्हा

**पहिलेंच 'चुंबन'**



"खरं सांगू गडे, तुमचेंच मी 'पहिलें चुंबन' झेललें."







जम्मांत तोंड पडणार नाहीं ' असें म्हणून परत नेमक्या फीस्टच्या दिवशींच तेथें कां उपस्थित होत नाहींत ? अहो पहिल्यापेक्षां दुसरी गोष्ट कितीतरी पट शास्त्रीय आहे कीं ! तात्पर्य काय; कोणत्याहि प्रकारानें आम्ही आचार्योंना सवलती दिल्या तरी त्यांचें तात्पर्य कांहीं गीतेला मानवेलसें वाटत नाहीं.

तैलबुद्धि असूनहि रामानुज कांहीच्याबाहीच सांगतात. रणांगणावर कचाकच मुंडकीं अंतराळांत उडवीत बसायचें कीं आपले टाळ कुटीत बसायचें ? मुलगा संमेलनाच्या जेवणाला निघाल्यावर, ' हें बघ बाळ, आज किनई तूं चांगले बारा चमचे एरंडेल घे, ' असें म्हणणारे आई–बाप तर रामानुजांच्या रूपानें अवतरले नाहींत ना ? आम्हास तर तसाच संभ्रम पडतो.

शेवटीं राहिले ' बुद्धिमतां वरिष्ठ ' असे टिळक. यांचें म्हणणेंहि खाडून काढणें आमच्या डाव्या हातचा मळ आहे. विद्वज्जनहो, युद्धें कशासाठीं असतात ? निषेधखलित्याला कागद राहिले नाहींत म्हणून कां असतात तीं ? अहो, उघडच नाहीं. युद्धें हीं मयूरसिंहासनावर बसून ' चोरावर मोर ' या म्हणीपेक्षां ' मोरावर चोर ' ही म्हण अधिक समर्पक कशी आहे, हें सिद्ध करण्याकरितां असतात; नोटेवर आपला ' एक रुपयांत सहा प्रति ' या दरानें काढलेला फोटो यावा म्हणून असतात; म्हणजे आपल्या कामगिरीचें फळ मिळावें म्हणून संग्राम होत असतात. आतां अशा ठिकाणीं ' फळाचाच आशा सोडून दे, ' असें म्हणणें एखाद्या बाळालाच शोभेल. लोकमान्य नसलेल्या तुम्हा-आम्हाला काडीमात्रहि पचायचें नाहीं तें !

साराश, वरील तीनहि तथाकथित गीता-हृदयवेत्त्यांनीं काढलेलें तात्पर्य गीतेला मानवत नाहीं.

यानंतर आम्ही कांहीं किरकोळ शंका उद्भवित करून अत्यंत शास्त्रीय पद्धतीनें त्याचें समाधान करणार आहोंत व आम्ही योजिलेला गीतार्थच कसा योग्यतम आहे, याचें केवळ दिग्दर्शन करणार आहोंत.

या शंकांचा व उत्तरांचा अधिक विस्तार आमच्या ' गीताः एक टिप्पणी ' या सुमारें पाच हजार पृष्ठांच्या आगामी ग्रंथामध्यें करणार आहोंत. त्यास साहित्य अकादमीचें पहिलें पारितोषिक मिळावें, अशीहि व्यवस्था होत आहे. पण तें सर्व अस्तु. विषयान्तर फार झालें. ' प्रकृतमनुसरामः '

पहिली शंका अशी कीं तुमचें म्हणणें उपक्रम–उपसंहाराला धरून आहे, हें क्षणभर मान्य केलें. परंतु मग तुम्ही मधल्या ग्रंथभागाची संगति कशी लावणार ?

याचें उत्तर असें:—गीतेचें अंतिम तात्पर्य आम्ही दाखविलें आहे. म्हणजे आमचें साध्य आम्ही मिळविलें आहे. 'Ends Justify means' असा न्याय आहे. तेव्हां ज्याअर्थी आमचें ध्येय हस्तगत झालें आहे त्याअर्थी आमची कृति तर्कशुद्ध असलींच पाहिजे. ज्यानें सुतानें स्वर्ग गाठला आहे, त्याला तें सूत खादी ग्रामोद्योगाचें आहे कीं ऑस्ट्रेलियांतल्या हजाराव्या पांढऱ्या मेंढीच्या लोकरींतला लाखावा धागा आहे, याची चिन्ता पाहिजेच कशाला ? दुसरें असें कीं गीतेवर आमचें प्रेम आहे आणि गीतेचा युद्धाशीं फार मोठा संबंध आहे. ' Everything is fair in love and war ' हें तत्त्व सर्वांनीं स्वीकारलेलें आहे. तेव्हां क्वचित्च आमचें म्हणणें तर्कपूत नसलें तरी निखालस मान्य करावयास हवें. अहो, सध्याच्या संभवनीय युद्धाच्या समयीं पंडितजींनीं, ' माझ्या घरचा बैल रोज बारा मण दूध देतो ' असें म्हटलें तरीदेखील त्यांच्यावर प्रेम करणाऱ्या खासदारांना झटकन् मान डोलवावयासच हवी ! तिसरें असें कीं पहिल्या अध्यायांत अर्जून घेरी येऊन पडला. त्याला शुद्धीवर आणण्यासाठीं श्रीकृष्ण त्याचे हातपाय ब्राह्मी तेलानें चोळूं लागला. मंत्र्याइतकी जाड कातडी असणाऱ्या अर्जुनाला चोळतां चोळतां तो भगवान् देखील चिक्कार थकला. तेव्हां कामाचा शीण जाणवूं नये म्हणून आणि थोडें जाडेंसें संस्कृत बोलून आजूबाजूला जमलेली बघ्यांची गर्दी घालवावी म्हणून ( कारण त्यावेळच्या लोकांना आपल्यापेक्षा शेळपट असणाऱ्या पोलिसांनीं हटविलेलें आवडत नसे ) त्यानं केली एक जुनाट उपनिषद् म्हणायला सुरवात. मधूनमधून जेवढ्यापुरता अर्जुन शुद्धांवर येई तेवढ्यापुरतें –म्हणजे संधिसाधु बनून–तो महात्मा त्याला ब्राह्मी तेलाविषयीं प्राथमिक माहिती सांगायचा. तेव्हां गीतेच्या मधल्या सुमारें पावणेअठरा अध्यायाचा गीतेच्या तात्पर्याशीं संबंध अपेक्षिणें म्हणजे निव्वळ खुळेपणाच आहे. चवथें असें कीं गीतेच्या तात्पर्याशीं उघडच संबद्ध नसणारा हा भाग श्रीकृष्णानें वैतागून म्हटला आहे, असें सिद्ध करण्यास अलीकडे भरपूर पुरावा उपलब्ध झाला आहे. त्याचा विचार आमच्या इतर असंख्य लेखांत केलाच आहे. तथापि येथें केवळ एका महत्त्वाच्या मुद्याकडे अंगुलिनिर्देश केल्याखेरीज आम्हांस राहवत नाहीं. तो असाः–नाहीं म्हटलें तरी श्रीकृष्ण हा लहानपणीं नगरापासून दूर राहणाऱ्या ( पहाः–त्रिवेंद्रम संस्कृत सेरीज–हरिअण्णा यांची काव्यप्रकाश व साहित्यदर्पण याची जोड आवृत्ति; शुद्धिपत्र ७ ) गवळ्याच्या मध्यें वाढलेला. तशांतच त्यावेळीं ही स्वारी दह्यापासून गोपींचीं वस्त्रें पळविण्याइतपत उनाड झालेली. बरें गुरूच्या धाकानें ही स्वारी थोडीबहुत सुधारली म्हणावी तर सांदीपनींच्या आश्रमांतहि कुठे गुरूच्या मुलाला वाचवून गुरूला खूपच कर, कुठें आश्रमांतून सुटण्यासाठीं त्याचा शब्द देखील खालीं पडूं द्यायचा नाहीं असें कर, असल्या सगळ्या उद्योगांत त्याचा वेळ गेला. त्यामुळें ज्यावेळीं तो सावध राहून संस्कृत बोलत असे त्यावेळीं त्याच्या व्याकरणाच्या चुका कमी होत असत. मात्र ज्यावेळीं तो चिडून, खवळून अथवा वैतागून भरभर बोलूं पहात असे, त्यावेळीं त्यांचा नुसता ढीग पडे. म्हणूनच गीतेच्या जवळजवळ पावणे अठरा अध्यायातील व्याकरणाच्या चुका या उरलेल्या भागापेक्षा कितीतरी पटीनें जास्त आहेत. तेव्हां मधल्या अध्यायांमधील प्रत्येक श्लोक हा श्रीकृष्णानें गीतेचें तात्पर्य डोळ्यासमोर ठेवून म्हटला आहे, असें समजणें म्हणजे वाटेल त्या अशास्त्रीयातील अशास्त्रीय प्रकाराचा अवलंब करून गीतेंतून आपल्याला इष्ट तोच अर्थ खेंचून काढणें याचें उत्तम निदर्शक आहे, असें आम्हास मोठ्या खेदानें येथें नमूद करावेंसें वाटतें. पाचवा मुद्दा असा कीं जरी आमचें ठाम मत वरीलप्रमाणें असलें तरी गीतेचे मधले सर्व अध्यायहि ब्राह्मीतेलविषयक आहेत. म्हणजे आम्हीं सांगितलेल्याच तात्पर्यास अनुकूल आहेत, असें आम्हीं लोकसमजुतीस तडा जाऊं नये म्हणून आवर्जून आमच्या " गीता ही महाभारतातील कीं 'तुझे आहे तुजपाशीं' मधील, आणि या दोन्हीं गीताचें खरें रहस्य काय ?" या सुप्रसिद्ध ग्रंथात शंभराव्या पानावर दाखवून दिलें आहे.

आतांपर्यंतच्या विवेचनांत आम्ही मुद्देसूदपणा, विचाराची तार्किक शुद्धता, लेखनाचा भारदास्तपणा आणि प्रतिपादनाची साक्षेपी मौलिकता इत्यादि आदर्श संशोधकाचे अनेक गुण दाखविले आहेत. त्याजवरून, उत्तर न सुचल्यानें आपल्या दुसऱ्या ग्रंथाचा खोटा





संदर्भ देणाऱ्या विद्वानांपैकीं आम्ही नव्हत, हें मर्मज्ञांच्या ध्यानांत आलें असेलच !

असो. दुसरी शंका अशीः—मधले संपूर्ण अध्याय ब्राह्मीस्थितिविषयक नाहींत, हें म्हणणें मान्य. पण त्यांतलें तुमच्या तात्पर्याची सूचना देणारे श्लोक तरी कसे निवडावयाचे ?

याचें उत्तर येणेप्रमाणें. त्यासाठीं तरल, संस्कारक्षम मन, प्रकाण्ड पाण्डित्य, आणि व्यवहाराचें यथातथ्य आनुभविक ज्ञान पाहिजे. येऱ्यागबाळ्याचें अथवा, मसाला पानपट्टीवर जशीं छिद्रें पाडलेल्या बाटल्यांमधून सुगंधी द्रव्यें टाकतात त्याप्रमाणें स्वतःच्या लेखनावर टिंबें शिंपडणाऱ्या आधुनिक मराठी ललित लेखकांचें काम नव्हे तें ! म्हणूनच, केवळ आमच्याच 'महाभारतांतील गीतेचे टीकाकारांनीं केलेलें महाभाग्त' या सहा इंची ग्रंथांत याचें उत्तर सहज सांपडूं शकेल.

तिसरी शंका अशीः—'एषा ब्राह्मी स्थितिः' मधील 'स्थिति' शब्दाचा अर्थ 'तेल' असा होतो तरी कसा ? आपट्यांच्या कोषांत तर तो मुळींच आढळत नाहीं !

यावर आम्ही म्हणतो-प्रत्येक शब्दाचा प्रत्येक अर्थ कोषांत दिलेलाच असतो, असें थोडेंच आहे ? उदाहरणच द्यावयाचें झालें तर मराठींतील 'तुझा अगदीं आबा झाला' आणि 'कसा मामा केलाय् लेकाच्याला' या वाक्प्रयोगांचें देतां येईल. 'मामा' आणि 'आबा' या अर्थांचें शब्द कोणत्यातरी कोषांत दिलेले आहेत कां ? अर्थातच नाहीं. तेव्हां 'स्थिति' शब्दाच्या 'तेल' या अर्थाला पुरावा काय, असें जर तुम्ही विचारलें तर 'नका, नका, त्याला पुरे नका', असेंच आम्ही सांगणार ! पुरावा पाहिजेच असा हट्टच धरलात तर रसिकांना रामानें जो चंद्राकरितां हट्ट धरला ना, त्याची आठवण होईल; पण अगदीं विनम्रभावानें सांगावयाचें तर ही 'चन्द्रा' कोण याचा अद्याप आम्हासही उलगडा झालेला नाहीं. असो. 'स्थिति' शब्दाचा जर 'तैल' हा अर्थ घेतला नाहीं तर आपल्या भाषेंतील 'स्थितप्रज्ञ' आणि 'तैलबुद्धि' या प्रयोगांची उपपत्ती लागत नाहीं, एवढाच बिनतोड पुरावा विस्तारभयास्तव आम्ही जिज्ञासूं पुढें ठेवतों.

यावरदेखील कोणी शंकेखोर विचारील कीं, 'अहो, स्थिति= तेल' हें मान्य. पण मग श्रीकृष्ण हा वारंवार 'हें गूढतम ज्ञान आहे' असें कां म्हणतो ? यज्ञमाहात्म्य कां विस्तारानें सांगतो ? ध्यानयोगाच्या नांवें एक अख्खा अध्याय कां टाकतो ?

शंका चांगली आहे. अगदीं रेडिओवर विचारल्या जाणाऱ्या प्रत्येक शंकेप्रमाणें.

तिचें उत्तर असेंः—आज देखील आपण असें पहातो कीं कोणतीहि कंपनी आपल्या मालाचा कृतिसिद्धांत Preparation formula हा अणुरहस्याप्रमाणें गुप्त ठेवीत असते. श्रीकृष्णाचें देखील तसेंच होतें. गुरें चारतां चारतां त्यानें गणेशखिंडच्या आसपास केलेल्या संशोधनांत ब्राह्मी तैलपद्धति त्याला गवसली. युद्धाची महागाई संपताच तो द्रष्टा भारताचें त्वरित औद्योगिकरण व्हावें म्हणून अर्जुनाला डायरेक्टर–जनरल नेमून ब्राह्मी तेलाचें Largescale Production करणार होता. पण युद्धाअगोदरच अर्जुनानें हातपाय गाळलेले पाहून त्याला त्याच्या संकल्पाअगोदरच ब्राह्मी गाळावी लागली. झालें ! अर्जुन शुद्धीवर आला. आतां तो आपलें औषध दुसऱ्याला सांगणार या कल्पनेनें कृष्णाची अगदीं भंबेरी उडाली. तेव्हां घाईघाईनें अर्जुनाला 'सेनयोरुभयोर्मध्ये' घेऊन त्यानें यज्ञप्रकिया म्हणजे ब्राह्मी तेल तयार करण्याची पद्धत आणि ध्यानयोग म्हणजे या तेलाच्या कारखान्यांतील Chemical Superwisers नीं कसें वागावयास हवें तें अगोदरच समजावून सांगितलें; हें ज्ञान गूढतम आहे, असें म्हणून त्याला गप्प केलें, आणि परत 'श्रेयान स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात्'- म्हणजे आपला माल साधारणच असला तरी इतरांच्या चांगल्या मालाची नक्कल करूं नये—या तत्त्वाचें कॉपरव्हेटिंग साऱ्या प्रतिपादनावर केलें. त्यावरें आपला हा ब्राह्मीसिद्धांत इतर कोणालाहि सांगूं नकोस हेंच श्रीकृष्णानें जरा सूचक व म्हणून सभ्य भाषेंत अर्जुनाला कळविलें.

येथें गीतेविषयक आमच्या सिद्धान्तावरील प्रमुख आक्षेपांचें समाधान संपतें आणि 'प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे' या न्यायानें आमचा सिद्धांत अबाधित रहातो.

तथापि या साऱ्या प्रकरणांत कोणा महाभागाला आम्ही ब्राह्मीतेलाचें प्रचारक आहोंत असाहि वास येण्याचा संभव आहे. परंतु अशा महाशयांस आम्ही 'उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा' याखेरीज अन्य काय उत्तर देणार ? असेल तें विटवा आणि नसेल तें भेटवा अशी असतें माणसाची वृत्ति ! सत्य जरी कपाटाच्या फळीवर असलें तरी असत्यच ! आम्ही ब्राह्मी तेलाचे प्रचारक काय ? मग बांधा शंकराचार्यांच्या गळ्यांत कर्मसंन्यासाची सोल एजंसी ! सांगा रामानुजांनीं भक्तीचें पेटंट घेतलें होतें म्हणून ! कंठशोष करा बाळ गंगाधर हे कर्मफलाशा असणाऱ्यांसमोर पिकेटिंग करीत असत म्हणून !! जर आम्ही प्रचारक असलों तर तेहि प्रचारकच. माल फक्त वेगळा आहे. त्यांचा आमचा.

पण डोक्याला थोडेंसेंदेखील ब्राह्मी तेल चोपडून विचार करणाऱ्याच्या टाळक्यांत उजेड पडेल कीं या गृहस्थानें सत्यसंशोधनाचें फारच मोठें काम केलें आहे. त्यामुळें त्यानें अर्जुनाला आणि त्याच्या नाकलोक, पाताळलोक इ. ठिकाणच्या चुलींना आनंदित केलें आहे. श्रीकृष्णाला सुख दिलें आहे आणि पर्यायानें संख्यातष्टया पुराणकारांनाहि चकविणाऱ्या कुटुंबांच्या जीवनांत संतोषाचे सागर रिते केले आहेत.

रोमन साम्राज्याचा इतिहास लिहून झाल्यानंतर गिबनची जी अवस्था झाली तीच आज आमची झाली आहे. वयाच्या सहाव्या वर्षापासून सोळाव्या वर्षापर्यंत दर उन्हाळ्याच्या सुटींत भोजना अगोदर आपण ज्याचा अभ्यास केला तो विषय हातावेगळा होतो आहे, म्हणून वाईट वाटत आहे. आतां आमची एवढीच इच्छा आहे कीं आम्ही शोधलेलें हें गीतेंतलें सत्य नटीच्या पहिल्या लग्नाच्या वार्तेप्रमाणें भूमंडळीं पसरावें आणि शंकर–जयकिसनच्या गाण्याप्रमाणें त्यानें लोकांच्या हृदयाचा कबजा घ्यावा. फार काय लिहूं ?

धन्य त्या श्रीकृष्णाची !
धन्य त्या अर्जुनाची !
धन्य त्या संजयाची !
धन्य त्या धृतराष्ट्राची !
धन्य त्या व्यासाची
आणि
धन्य धन्य त्या ब्राह्मी तेलाची !!

●●●



अनुक्रमणिका



# दर्भाचा कावळा

—वसन्त फेणे

*‘दर्भाचा कावळा खोटा असतो. त्याला डोळा नसतो... म्हणून त्याला दिसत नाहीं!’*

*मनाला हुरहूर लावणारी ही एक वेगळीच कथा...*

**मामी** वारल्याची बातमी मला समजली आणि मी अति खिन्न झालों. पोरकेपणाच्या भावनेनं लपेटला गेलों. माझं म्हणतां येण्यासारखं वडील माणूस आतां या दुनियेंत मला कुणीं नाहीं या कल्पनेनं जीव करपूं लागला. जगांत मी जणुं एकाकी आहे असं वाटूं लागलं. आणि त्याचबरोबर विचार आला, मामीनं कसा बरं जीवनभर असा असह्य एकाकीपणा सहन केला!



अनुक्रमणिका

मामीचं जीवन अगदीं एकाकी गेलं! मामीच्या एकाकीपणाविषयीं मला नव्यानं अनुकंपा वाटूं लागली. वाटलं मामी जोगिणीसारखी जगली आणि एकाकीपणें वारली. कुणीहि नव्हतं तिच्याजवळ. जवळ असण्या-सारखं माझ्याशिवाय नव्हतंच कुणी. आणि मीच तिच्यापासून साठसत्तर मैल दूर. तिच्या मृत्यूची वार्ताच मला तिसऱ्या दिवशीं समजली. मी फिरतीवरून आल्यावर!

मला विलक्षण चुटपूट लागली. तिला अखेरच्या घटकेला माझी आठवण आली असेल? मला हांका मारल्या असतील कां तिनं? कांहीं समजायला मार्ग नव्हता. मामी करंजगांवला गेलीं दोन वर्षे रहात होती. तिथंच ती अेका सकाळीं मृतावस्थेंत आढळून आली. रात्रीं झोपली ती सकाळीं उठली नाहीं. जाग नाहीं म्हणून चौकशी करतां शेजाऱ्यांना मामीनं जगाचा निरोप घेतल्याचं समजलं. मला पत्र लिहून बातमी कळविणाऱ्या तिथल्या एका ओळखीच्या गृहस्थांनीं लिहिलं होतं, 'तुमच्या मामी पुण्यशील. आजन्म व्रतस्थ राहिल्या. म्हणूनच त्यांना असं चांगलं मरण लाभलं.'

मामी व्रतस्थ राहिली जन्मभर. मला आठवतं तेव्हांपासून मामीचं कपाळ पांढरंच होतं. माझे मामा—मी त्यांना पाहिलं नव्हतं. त्यांचा कुठं फोटोहि शिल्लक नव्हता. माझ्या आई-बाबांच्या नि मामीच्या स्मृतींतच त्यांची छबी. मला मात्र वारंवार वाटे, मामा पाहिजे होते. ते जगायला पाहिजे होते पण हें मला वाटायचं तें मामीमुळं. कधीं कधीं वाटायचं कीं निदान मामांचं लग्न तरी व्हायला नको होतं.

लग्नानंतर दीडच वर्षांनीं म्हणे मामा वारले. माझ्या जन्मापूर्वीच आई म्हणायची बरं झालं, 'पोर नाहीं झालं! मलाहि थोडीफार समज येऊं लागल्यावर वाटत असें खरंच मामीला मूल असतं तर तिच्या गळ्यांत तें लोढणं झालं असतं. परंतु मामीच्या मृत्यूची बातमी ऐकली नि वाटलं, छे! छे!! मामीला एखादं तरी मूल व्हायला पाहिजे होतं. मामीमागें आतां कुणी राहिलं नव्हतं. माझं आजोळचं घराणं खुंटलं. वंशवल पार खुंटली, या जाणीवेनं मी अस्वस्थ झालों. आईला एकच भाऊ. ते माझ्या जन्माआधींच निवर्त-लेले. मी पंधरा वर्षांचा असतांना आई वारलेली. मामीच तेवढी माझ्या आजोळीची खूण होती. तीहि आतां नाहीं. माझ्या आजोळचा निर्वंश झाला. हें अपरिहार्य होतं. पण मामीच्या मृत्यूमुळं तें सत्य विदारकतेनं माझ्या प्रत्ययास आलं. असं व्हायला नको होतं. निदान नियतीच्या खेळांत मामीसारख्या निष्पाप, प्रेमळ साध्वीचा बळी जायला नको होता.

दुसऱ्याच क्षणीं माझं मलाच आश्चर्य वाटलं. निर्वंश, नियतीचा खेळ, वगैरे समजुती मुळींच प्रभाव पाडूं शकत नसत. निदान मला तसं वाटे. पण त्या क्षणीं मात्र मला तसं वाटूं लागलं. उत्कटतेनं वाटूं लागलं कीं माझ्या आजोळीचा निर्वंश झाला. नियतीनं मामीचा नाहक बळी घेतला. मला समजायला लागल्यापासून मामी कधीं याच्याकडे चार दिवस, त्याच्याकडे चार दिवस अशी असे. अर्थात् जिथं तिची गरज पडे तिथें ती जाई आणि कुणाकडे कांहीं काम नसे तेव्हां मामी आमच्याकडेच राही.

मला आठवतं, माझ्या लहानपणीं मामी फार सुरेख दिसत असे. गोरीगोरी पान. जरा ठेंगणीच. सदा स्मितमुखी. पण हंसण्यासाठीं तिचे ओठ क्वचितच विलग होत. मात्र ज्यावेळीं ती तशी हंसे त्यावेळीं देवापुढील तेवत्या समईसारखी ती प्रसन्न वाटत असे. पवित्रहि तशीच.

> **• तीन आगी पहा नि स्वयंसेवक व्हा!**
>
> युद्धाच्या वेळीं जर्मनीमध्यें "अग्नी-शामक" खात्यांत काम करण्यासाठीं कोणीही पुढें येत नव्हतं. मेजरला पेच पडे,—माणसं कुठून आणावीत? परंतु जेव्हां कुठें आग लागे तेव्हां तिथें बघ्यांची ही गर्दी जमे. तेव्हां मेजरनें आपल्या सैनिकांनां सांगितलं, 'हे बघा, आग बघण्यासाठीं जे नागरिक जमतात त्यांचीं एक नामावली तयार करा.' ह्याप्रमाणें प्रत्येक वेळीं नामा-वली तयार करण्यांत येत होती. मेजरनें मग ती नामावली चाळून पाहिली. ज्या नागरिकांचीं नांवें तीनदां आढळली त्या सगळ्यांना त्यानें "अग्नी-शामक" खात्यांत काम करण्यासाठीं दाखल करून घेतलें!

मामीचं चरित्र्य धुतल्या तांदुळासारखं. सर्वांच्या तो कौतुकाचा विषय होता. कधीं तिनं कुणा पुरुषाकडे मान उचलून पाहिलं नाहीं. मला आठवतं तिच्या पाठमोरी आई एकदोन वेळां म्हणाली होती, 'कितीहि पापी पुरुष असला तरी तिच्याकडे वाकड्या नजरेनं पाहणार नाहीं!'

आईच्या त्या उद्‌गारांची मला आठवण झाली आणि वाटलं कां अशी मामी व्रतस्थ राहिली बरं? तिचा पुनर्विवाह कां झाला नाहीं तें मला कधींच समजलं नाहीं. तसा प्रयत्न झाला होता किंवा नाहीं तेंहि मला माहीत नाहीं. पण मला वाटूं लागलं—तीव्रतेनं वाटूं लागलं, मामीने इतकं व्रतस्थ रहायला नको होतं. मानवी जीवनांतील महान् सुखाला तिनं आंचवायला नको होतं. तिचं पाऊल थोडंफार वांकडं पडलं असतं तरी चाललं असतं; पण तिनं असं वैराग्यपूर्ण जीवन घालवायला नको होतं!

असे विचार माझ्या मनांत येणं रास्त होते कां? जिनं आपलं चारित्र्य धुतल्या तांदुळासारखं घालवलं त्या साध्वीबद्दल असे विचार माझ्या मनांत यायला नको होते. पण ते येत होते. फिरफिरून येत होते. त्यांतील सत्य मनाला प्रतीत होत होतं. अन् मामीच्या जीवनांतली ही उणीव सारखी मनाला जाचत होती. वाटत होतं मामीच्या विफल यौवनकालांत कुणातरी पुरुषानें डोकावून जायला पाहिजे होतं.

माझ्यावर तिचा विशेष लोभ होता. मामी आमच्या घरीं असें तेव्हां ती मला कुशींत घेऊन झोंपत असे. माझ्या लळ्यामुळेंच आईच्या निधनानंतर ती दोन वर्षे कुठें न जातां आमच्याच घरीं राहिली होती. त्या काळांत बाबा ओटीवर अंथरूण घालून झोंपत आणि मामी मला जवळ घेऊन माजघरांत झोंपत असे. मामी गेल्यानंतरच बाबा आंत झोंपायला लागले!

त्यावेळीं मामी निघाली तो प्रसंग मला अजून आठवतो. मामी मला पोटाशीं धरून हुमसून हुमसून रडत होती. प्रत्येकवेळीं निरोप घेतांना तिचे डोळे पाणावत. पण यावेळीं तिचं दुःख अनावर झालं होतं. तिची निघायची वेळ झाली, तशीं ती बाबांच्या पुढ्यांत गेली. त्यांना तिनं वाकून नमस्कार केला. त्यांच्या दोन्ही पायांना हात लावला आणि म्हणाली,

"रागवूं नका माझ्यावर. मला गेलंच पाहिजे. कांहीं झालं तरी तीं माहेरचीं माणसं आहेत. त्यांना निकडीच्यावेळीं मदत केलीच पाहिजे. माझ्यावर रागावूं नका! पेंद्याला सांभाळा माझ्या!!'








मलाहि रडूं आवरत नव्हतं. मामी आयुष्यांत बाबांच्याकडे पहिल्या प्रथम तेव्हां बोलली. बाबांचेहि डोळे लालसटले. त्यांचा चेहरा आंतल्या आत अश्रूंनीं उतरला असं वाटलं. ते पुरुष म्हणूनच त्यांना आवरावं लागलं.

'मामी' म्हणून मी मामीला मिठी मारली.

'पेंद्या ! माझा पेंद्या तो !' असं आसवांनी भिजलेल्या स्वरांत म्हणत त्या माझ्या पाठीवरून हात फिरवूं लागल्या. माझ्या डोईवर अश्रूंचा अभिषेक करुन त्या बाहेर पडल्या. मी त्यांना निरोप देण्याकरितांहि पुढं जाऊं शकलों नाहीं. मी दारांतच उभा होतों. अन् जडावलेलं एक एक पाऊल टाकून जातांना आसवांच्या सरींतून मी मामीला पाहत होतो.

त्यानंतर मी नि बाबा काकांच्याकडे रहायला गेलों. मला तिथं रहाणं आवडत नसे. पण नाइलाजानं त्यांना आपलं बिऱ्हाड सोडावं लागलं. मामी तिथंहि दोन-चार महिन्यांनीं येई. येतांना माझ्यासाठीं कांहीं खाऊ आणी. मला गोष्टींचीं पुस्तकं आणायला पैसे देई. मला ती वारंवार म्हणे, 'पेंद्या लवकर मोठा हो बरं. पण मोठा झाल्यावर बाबांना विसरूं नकोस. म्हातारपणीं त्यांना आधार नाहीं.''

मी कॉलेजमध्यें जाऊं लागल्यावरहि मामी मला जवळ घेऊन कुरवाळीत असे. कुणी जवळपास असलं कीं मला कसंसंच होई. पण कुणा नसलं तर मी चक्क मामीच्या मांडीवर डोकं टेकून पडत असे. मी तिला एकदां असंच पडल्या पडल्या सांगितलं होतं, 'मामी, आतां माझं शिक्षण पुरं होऊन नोकरी लागली कीं मी वेगळं बिऱ्हाड करणार. मग तूं नेहमीं आमच्याकडेच रहायचं !'

'हो रे पेंद्या ! किती गुणाचा बाळ आहे. तुझी आई हवी होती रे असलं बोलणं ऐकायला. मी फुटक्या नशीबाची राहिल्यें अन् ती उठून चालली. हं !' मग कितीतरी वेळ माझं डोकं थोपटीत ती राहिली होती.

माझ्या लग्नाच्या वेळचाहि एक प्रसंग मला नेहमीं आठवतो. खरं म्हणजे त्यांत विशेष कांहीं नाहीं. पण मला एक प्रकारची रुखरुख वाटते.

मामी लग्नासारख्या समारंभाला कधीं हजर रहात नसे. ती घरांत कुठंतरी बसून असे. मी नववधूला घेऊन गृहप्रवेश केल्यावर देवाला जोडीनं नमस्कार घातला, अन् मामीच्याकडे जाऊन माझ्या पत्नीला म्हटलं, 'या माझ्या मामी-माझ्या आईच्या ठिकाणीं आहेत' आणि मी नमस्कार केला. त्याबरोबर माझ्या पत्नीनंहि 'नमस्कार करते सासूबाई !' असं म्हणून मामीला नमस्कार केला. मी मामीकडे पाहिलं. तिनं आपल्या अश्रूंना मोठ्या निकरानं आळा घातला होता. मात्र आपण 'सासूबाई' म्हणण्यांत कांहीं विशेष समंजसता दाखविली या विचारानं व माझ्याकडून नजरेनं तरी शाबासकी मिळेल या अपेक्षेनें माझी पत्नी माझ्याकडे पहात होती. माझ्या पत्नीनं गंभीरपणानं, मान खालीं घालून उभं रहायला पाहिजे होतं. पण ती हर्षोत्फुल्ल व अपेक्षापूर्ण नजरेनं माझ्याकडे पहात होती. तिची ती नजर माझ्या मनाला ओरखडून गेली. आणि ती जखम अजून माझ्या मनांत आहे. तीबद्दल माझ्या पत्नीजवळ कधींच मी बोलूं शकलों नाहीं; त्या वेळची रुखरुख पुनः आज उसळी मारून आली.

देवघरांतील समईसारखी स्निग्ध, पवित्र, आणि सौम्य अशी मामीची मूर्ति माझ्या डोळ्यासमोरून हलेना. संसाराच्या व्यापांत तिला दिलेलं आश्वासन मी विसरलों होतों.-अन् आठवण होई त्यावेळीं तें अलगद झटकून टाकत होतों. या गोष्टीची आठवण पुनः पुन्हा उचंबळूं लागली. त्या साध्वीनं माझ्यावर इतका जीव ओतला, पण मी तिच्यासाठीं कांही केलं नाहीं तसं. कधीं मधीं पैसे पाठविले असतील तेवढेंच. मला आतां हळहळ वाटूं लागली. मनांत अनुताप दाटूं लागला. मी ठरवलं तिचे उरलेले विधि व्यवस्थित करावयाचे. नाहींतरी मी तिच्यासाठीं काय केलं होतं ?

मी दहाव्याला अन् अकराव्याला कारंजगांवला येतो, असं कळवलं. दहाव्या दिवशीं सकाळीं मी तेथें पोंचलों. भटजी तेथें होतेच. मी लगेच क्रियेसाठीं निघालों. भटजींना सर्व कांहीं व्यवस्थित करायला तीन तीन वेळां बजावलं. त्यांना भरपूर दक्षिणाहि दिली.

दुसऱ्या दिवशींच्या विधीसाठीं सकाळीं लवकर येण्याचं कबूल करून भटजींनीं निरोप घेतला. मी ज्या ओळखीच्या गृहस्थांकडे उतरलों होतों, त्यांच्याकडे गेलों. मामींच्या आठवणीमुळें माझ्या मनावर विमनस्कपणाचं सांवट पसरलं होतं. ज्यांच्याकडे मी उतरलों होतों ते वयस्क होते. त्यांचं मामीशीं दूरचं नातंहि होतं. ते सांगत होते, 'मामी खऱ्या पतिव्रता. इतक्या बालपणांत वैधव्य आलं. मूलबाळ नव्हतं. दिसायलाहि चांगल्या. कुणीहि तिच्याशीं पुनर्विवाहाला तयार झालं असतं. पण त्यांनीं पातिव्रत्य सोडलं नाहीं. त्यासाठीं संसारसुखावर पाणी सोडलं; आणि इतरांच्या संसारासाठीं कष्ट उपसले. असं पतिव्रत्य आढळणं आजकाल कठीण !'

'होय न !' मीहि अंतरीच्या उमाळ्यानं म्हणालों, 'मामांचा घड एक फोटोहि नव्हता हो, त्यांच्यापाशीं !'

'हं ! दिवंगत पतीची मानसपूजा करीतच तिनं आयुष्य वेंचलं. पण कधीं तोंड कडू केलं नाहीं. चारित्र्य तर धुतल्या तांदुळासारखं. खरी पुण्यश्लोक होती. कधीं कुणाला त्रास दिला नाहीं. मरतांना देखील नाहीं, मोठी पुण्यवान बाई !'

दुसऱ्या दिवशीं भल्या पहाटे मी मामी रहात होती त्या ठिकाणीं गेलो. तिची एक मोडकीशी पेटी होती. चारसहा भांडीं होती. वरच्या काठीवर तिचं पातळ वाळत पडलं होतं. तें पाहून मला भडभडून आलं. मी सहज तिची पेटी उघडून पाहिली. तींत दोनचार साड्या होत्या. एक शाळीग्राम होता. एका डबींत मंगळसूत्रांत घालतात तसले काळे मणी होते. सोन्याच्या वाट्याहि तेथें होत्या. त्यावर कुंकुम होतं. मला आंतड्यांत तुटल्यासारखं झालं. आपल्या मृत पतीचा हा एवढाच स्मृत्यावशेष मामीपाशीं होता. मामीनं तो सांभाळून ठेवला होता ! खिन्न मनानं मी ती डबी आंत ठेवली. तिचा तो श्रद्धाविषय ठेवतांच माझे हात नकळत जोडले गेले. माझ्या मनांतील मामींच्या मूर्तीभोंवतींचं वलय अधिक कांतिमान् झालं. बाहेर काढलेल्या साड्या आंत ठेवूं लागलों. शेवटची साडी-जी जरीची जुनी होती-ठेवतांना

## महत्त्वाची सूचना–

ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.

—व्यवस्थापक







अनुक्रमणिका

एक चिटोरं पडलं. कुतूहलानं मी तें पाहिलं. तें माझ्या बाबांचं अक्षर होतं.

मला अचंबा वाटला. मी तें उलगडून पाहिलं. सुरवात पाहून मला कससंच झालं. त्यांत लिहिलं होतं, ' माझ्या लाडक्या रत्ना !'

मी चमकलों. आश्चर्य माझ्या डोळ्यांत मावेना. पोटांत अनामिक अशी भीति आंतडी कुरतडूं लागली. पण कुतूहल कमालीचं होतं. मी तें वाचूं लागलों. एकदोन वाक्यं वाचताच त्याचा आशय माझ्या डोक्यांत शिरला होता. माझ्या डोक्यांत सैरभैर सुरूं झाली ! माझे डोळे त्या अक्षरांवर ठरत नव्हते. तरी मी तें धडधडत्या छातीनं वाचून काढलं ! त्यांत एक वाक्य होतं, ' ती असतांना चुकून माकूनच जें लाभत होतं तें स्वर्गसुख तिच्यानंतर दोन वर्षं तूं मला मनमुराद दिलंस !' शेवट केला होता. ' तुझा मुक्या. ' मुकुंदरावांनीं आपलं नांव पंचवीशींतल्या तरुणासारखं लिहिलं होतं ' मुक्या !'

' मनमुराद ! ' ' ती असतांना चुकूनमाकून मिळणारं ' हे शब्द जणूं स्क्रूसारखे माझ्या मनांत फिरवून बसवले जाऊं लागले. मामीचा पुरुषाशीं संबंध...माझ्या वडिलांशींच असला संबंध ! भटजी आल्याचं समजतांच मी त्यांच्यासह धर्मशाळेंत गेलों. एका कुलटेला–माझ्या वडिलांशीं अनैतिक संबंध ठेवणाऱ्या अन् त्यांना माझ्या आईचा मृत्यु ही निष्पत्ति वाटावयास लावणाऱ्या एका कुलटेला मी अर्घ्य देत होतों. माझ्या वडिलांशीं संबंध...कां असे कितीहि संबंध असूं शकतील ! आईच्या पश्चात घरांत असताना ओटीवर झोंपणाऱ्या अन् आई हयात असतांना ' चुकूनमाकून स्वर्गसुख मिळणाऱ्या ' बाबांचा तरी कुणां संशय घेतला होता ? मामीला तर सारे पुण्यशील साध्वीच म्हणत ! या साध्वीशीं संग करणारे इतर अनेक...इतर अनेक...

कटू विचारांची सैरभैर डोक्यांत सुरूं असतांनाच आठवण झाली–तिच्या मृत्यूची बातमी ऐकल्यावर मला वाटलं होतं, तिच्या यौवनांत कुणातरी पुरुषानें डोकावून जायला पाहिजे होतं. पण छे ! या आठणीनींहि मामींची मूर्ति माझ्या मनांत एकसंध होऊं शकत नव्हती. त्यावेळीं तिच्याकडे सहानुभूतीनें पहाणारा माझा डोळा जणूं नाहींसा झाला होता. मामी व्यभिचारी विधवा होती. माझ्या वडिलांशींहि तिनं संबंध ठेवला होता ! पण जगली पतिव्रता म्हणून नि मेली साध्वी म्हणून...त्या व्यभिचारिणीला मी अर्घ्य देत होतो.

भटजींनीं पिंड ठेवले नी म्हटलं, ' कावळे शिवले नाहीं तर कांहीं सांगायचं वगैरे, का दर्भाचा कावळा करून लावायचा ?'

' करा दर्भाचाच कावळा अन् लावा चटकन् ' मी दर्भासारख्या रुक्ष अन् खरखरीत स्वरात म्हटलं. कालच्या आस्थेवाईकपणामुळे असेल त्यांनींहि माझं उत्तर ऐकून चमकून पाहिलं.

त्यांनीं बोटावर दर्भ धरून ' कावळा ' करायला सुरवात केली अन् तोंडानं ' वायस ', ' वायस ' करून कावळ्यांना बोलावलं.

' लावा आतां पिंडाला ' मी जरा चिरडीनं बोललों.

भटजींनीं तो दर्भाचा ' कावळा ' पिंडाजवळ नेला.

त्याकडे पाहून मी कांहींतरी विचारायचं म्हणून विचारलं, ' हा कावळा काय ?'

' हा दर्भाचा कावळा ! याला डोळा नसतो ' असं म्हणून त्यांनीं दर्भाचा कावळा पिंडाला लावला !

' दर्भाचा कावळा खोटा असतो. त्याला डोळा नसतो...

*मानवी स्वभाव व धर्मश्रद्धा यांचें नातें जवळीकतेचें आहे. अशाच धर्म व श्रद्धा यांतील शाश्वत मुल्यांची हंसत-खेळत चर्चा करणारा* **श्री. मधुकर केचे** *यांचा हा वाचनीय लेख......*



# धर्म प्रसंग

**मी** तसा धार्मिक नाहीं. धर्मभोळा-खिळा तर मुळींच नाहीं. एखाद्या संताच्या पाया पडणेंदेखील माझ्या जिवावर येते. उगीचच लोकांमध्यें चर्चा–वादंग नको म्हणून तशावेळीं संताच्या पाया मी पडून जातो. आपल्यापेक्षां वडील माणसाच्या पाया पडावें, त्यामुळें आपल्याच अंगीं नम्रता बाणते आणि नम्रता हा ज्ञानाचा पाया आहे इ. बोध मला वडिलांनीं दिला. तेव्हां माझें तें लोटांगण हा धर्माचा भाग नसून साधी रीतभात असते. घरचें वळण मला तसें वागायला लावतें. पण नुसतें घरचें वळण किंवा कुटुंबसंस्थेनें शिकवलेलें नागरिकत्व एवढाच हिस्सा त्या पाया पडण्यांत असेलसें मला वाटत नाहीं. मी कितीहि नाकारलें तरी धर्माकडे माझा थोडासा कल आहे. धार्मिक नसलों तरी मी अश्रद्ध नाहीं. नास्तिकता माझ्यांत नाहीं. कुठलें तरी एक आकर्षण मला धर्मजीवनाकडे खेंचून नेतें. त्यांत मोक्ष–मुक्तीची इच्छा नसतें. ती कधींहि राहणार नाहीं. सायंकाळचें रंगीत आकाश बघत असतांना मला कोणी मुक्ति देऊं केली तर मी त्याच्यावर निश्चित चिडेन. भर दुपारीं उन्हाच्या वाफा कौलारू छपरांवर नाचत असतांना किंवा जमिनीवरची धूळ घेरदार लयीत व मस्तींत उडत असतांना या पंचेंद्रियांतील अध्यामिक अनुभवाची मला मुळींहि ओढ नसते. धर्माचें शेवटचें साध्य म्हणजे देहत्याग व देहत्याग म्हणजे रंगीबेरंगी उन्हां–पावसांनीं, हिरवळीनें, रगीच्या वादळ वाऱ्यानें भरलें भारलेलें हें जग पींहूं–भोगूं शकणारा देह त्याचा त्याग ! म्हणूनच धर्म किंवा संत यांचें मला वेड नाहीं. त्या मोक्षाच्या कल्पनेच्या तुलनेंत तर मला गरम वाफा देत खमंग दर्वळणारी पोपडेदार भाकर व लसणाची चटणी अधिक प्रिय आहे. इतकें असूनहि संत मला मनांत कुठें तरी आवडतात. धर्माच्या कल्पनांनीं नव्हे, माझी भौतिकाकडे जी ओढ आहे त्या ओढीनेच ते आवडतात. भौतिकामध्यें जें सुंदर आहे, आकारदार आहे त्याचा प्रत्यय संतांच्या जीवनांत मला भरपूर मिळाला. या धकाधकीच्या जीवनांत एरवीं जें दिसलें नसतें तें मला संतांमुळें दिसलें.

जीवनाच्या प्रातःकाळीं मला अगदीं पहिल्यांदा दर्शन झालें तें श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या छायाचित्राचें. धोतराचा एक सोगा खांद्यावर घेऊन उघड्या अंगानें बसलेले श्रीरामकृष्ण पाहतांना मला खूपच मजा वाटे. त्यांची ती अतिविशालात स्थिरावलेली देवदीठ अथवा चेहऱ्यावरचें पारलौकिक तेज यापेक्षां त्यांचे तें नुकतेंच स्नान केल्यासारखें उघड्या अंगानें बसणेंच मला जास्त लोभस वाटे. कितीतरी वर्षेंपर्यंत तर ते संत आहेत याचाहि मला पत्ता नव्हता. आपलें कोणी तरी नातेवाईक आहेत अशी कल्पना मी त्यांच्याबद्दल केली होती. त्यांचें तें उघडें व स्वच्छ अंग बदामी रंगाचें व अत्यंत तजेलदार होतें. आपण जर त्यांच्या अंगाचा वास घेतला तर तो पिकल्या आंब्यासारखा येईल असें वाटे. अनेकदां तर त्यांच्या अंगावरून जीभ फिरवण्याचा मोह मला होई. माझ्या अत्यंत आवडत्या कुत्र्याला अंग चाटण्याची संवय होती. मी देखील आईच्या हातापोटावरून अनेकदा जीभ फिरवीत असें. असे सर्वांशींच करावेसें मात्र मला वाटत नसे. एक केवळ आईबद्दल; दुसरें त्या तसबिरींतल्या संध्यारंगी देहाच्या माणसाबद्दल.

आमच्या वडिलांच्या बैठकींत स्वामी विवेकानंदांची एक तसबीर होती. भली भव्य ! तो रुबाबदार फेटा, बंद कोटांतून उफाळणारें स्वामी-जींचें तारुण्य आणि चेहऱ्यावरचें रसरसीत व्यक्तिमत्व. त्यांच्या कमरेला एक शेला कसलेला होता. आपण अगदीं हुबेहूब या माणसासारखें दिसावें असे मला कैकदां वाटून जाई. दुपट्टा, धोतर काय जें मिळेल तें डोक्यांला बांधण्याचा मी प्रयत्न करी. घरच्या माणसांना मात्र वाटे कीं मी संतमंडळीप्रमाणें एक दिवस घरदार सोडणार. माझ्या मात्र तशी कल्पना गावीही नव्हती. एवढेंच कशाला पण ही फोटोंतली मंडळी घरदार सोडलेली आहे हेंहि मला ठावें नव्हतें. तें तसें ठाऊक असतें तर बहुधा त्यांच्याबद्दल माझा आदर फारसा टिकलाच नसता. घर सोडायचें म्हणजे बरें थोडेंच आहे ? घर सोडणें कीं आई सोडणें आलेंच. मग निजायचें कोणाजवळ ? आणि जेवायला, स्नानाला, आमच्या कुत्र्याशीं खेळायला, दादाजींना भातक्यासाठीं पैसे मागायला कशालाच म्हणून कधींच घरीं यायचें नाहीं, हें म्हणजे काय ? पण त्या अटी विवेकानंदांकडे पाहतांना कोणीं घातल्या नाहींत आणि मग त्यांच्याबद्दलचें प्रेम वाढत गेलें.



अनुक्रमणिका






मराठी दुसरी-तिसरींत ध्रुव, प्रल्हाद, चिलिया इ. च्या गोष्टी मास्तर सांगत. ऐकल्या तशा त्या दुसऱ्या दिवशीं लिहूनहि न्याव्या लागत. मास्तरांच्या मुखावर तशा वेळीं आपण कांहीं तरी रसभरीत असें मुलांना सांगत आहोंत असा भाव असे. मला मात्र त्यांत रस कुठें तेंच दिसेना. बाप आग्रह करीत असतांनाहि ध्रुवानें मागें फिरायचें नाहीं म्हणजे काय ? मारली असेल सावत्र आईनें लाथ-सख्खी आई नसते का मारीत ? आणि तो प्रल्हाद ! बापासारख्या बापावर प्रेम करायचें सोडून बसला तापत्या तेलाच्या कढईत ! आतां कढईत बसणें हें काय आनंदाचें आहे ? चिलियाची ती आध्यात्मिक मातृभक्ति तर मला अक्षरशः शहारे आणी. उखळांत शिर कांडत असतांना आपण पळून जायचें नाहीं ही कुठली अक्कल ? या सर्वांना गोड (!) फळ काय तर म्हणे त्यांना विष्णु भेटला. विष्णु ! तो गदा चक्र, किरीट वगैरे धारी ! तो भेटणें यांत आनंद काय आला ? विष्णु भेटल्यानंतर त्यानं या मुलांना कांहीं खाऊ दिला कीं नाहीं याचा तर त्या गोष्टींत कुठें उल्लेखच नसे. वरें त्या 'अमकेतमकेधारी'च्या यादींत विष्णुजवळ पद्म, नंदक वगैरेंच्या जोडीला शेंगदाणे, काजू, खडीसाखर वगैरे कांहींहि नव्हतें; तें नव्हतें तर निदान प्रल्हादाला खेळण्यासाठीं म्हणून त्यानें आपली गदा तरी द्यावी किंवा चिलियाला कमळ द्यावें ! तेंहि नसे. म्हणूनच धर्मभावनेस पोसणाऱ्या या कथा व त्यांतलें नेमकें शेवटीं भेटणारे विष्णु यांच्याबद्दल मला जिव्हाळा असण्याचें कारण नव्हतें.

त्या मानानें श्रीकृष्णाबद्दल मला प्रेम होतें. त्याच्या कथा खऱ्या रसदार असत. ती ऐन झोपेच्यावेळीं पाठीत धपाटे मारल्यासारखीं वाजून जागे करणारी शाळेची घंटी किंवा मारके पंतोजी इ. त्याच्या कथेंत कोठेंहि नसत. मस्त दहींदूध-लोणी खावें. त्या दह्यादुधाच्या अनुषंगानेच शिंक्यावर उड्या माराव्या, गवळणींना अडवावें, रानांत गाई चाराव्या वा ! वा ! आमच्या नशिबीं असें अवसेपुनवेलाहि यायचें नाहीं. मोठ्या बाईंच्या घरीं कवठाळला मी बाळकृष्णाची एक भली मोठी तसबीर पाहिली. माझ्या मनावर निळ्याहिरव्या रंगाचे चेंडुक करणारी ती तसबीर ! श्रीकृष्ण रानांत गाई चारत असतांना ती फोटोग्राफरनें काढली असा माझा समज तेव्हां होता. जेव्हां तो खोटा टरला त्यावेळीं मला अपरिमित दुःख झालें. तें ज्ञान मला झालेंच नसतें तर मी भाग्यवान राहिलों असतो. त्या तसबिरींत निळे आकाश, हिरवी दूरदूर जाणारी राई, चिमुकलीं झुडपें, अनंत आकाशाला त्याचें रूप दाखवणारी यमुना नदी अशा दृश्यांची बहार होती. मधोमध एक कदंबाचा वृक्ष होता. त्याच्या अंगाशीं टेकून त्या आकाशासारखा निळा व गोंडस कृष्ण बांसरी वाजवीत होता. त्या बांसरीचे सूरहि निळे हिरवे आहेत असा भास होई. त्याच्या डोक्यावर एक जरीचा मोरपिसांचा मुकुट होता. तशा टोप्या आम्हांला मिळत नसत. वरखेडच्या आत्याबाईनीं मला एक जरीची टोपी दिली होती; ती त्या मुकुटासारखी नव्हती. तें चित्र मला खूप आवडलें. खूप म्हणजे खूपच आवडलें. चोरून नेण्याइतकें तें लहान नव्हतें. शेवटीं मी त्याचा एकूणएक रंग व रेषा मनांत भरून घेतले.

पुढें केळकरशास्त्री अंतोन्यास पुराण वाचावया आले. श्रीकृष्णाची कथा त्यांनीं लावली तेव्हां सारा गांव डुल्त होता. मी सर्व्यांपेक्षां जास्त. लोक त्यांत रंगून जात होते; पण त्यांना कुठें तरी एक विकल्प होता. या कथा काल्पनिक आहेत असें त्यांना नेहमीच्या जीवनांतली हलाखी हळूच कानांत सांगत असावी. काल्पनिक नसतील तर निदान फार जुन्या, शतक्याच्या पलीकडच्या होत्या व आतां त्या नुसत्या ऐकूनच आनंद घ्यावा ही तडजोड त्यांनीं केली होती. अशा कथा ऐकण्यानें पुण्य लाभतें व तशा पुण्यानें पुढें ईश्वर भेटतो अशी हाव त्यांत होती. ईश्वर-तो नुसताच भेटणारा विष्णु ! त्यामुळें मला तसलें कांहीं हाव धरण्याचें कारणच नव्हतें. शिवाय त्या काल्पनिक कथा आहेत असेंहि मानण्याची आवश्यकता मला नव्हती. मी नुकताच कवठाळला श्रीकृष्णाचा फोटो नव्हता का पाहिला ? मग तो अशक्य अथवा काल्पनिक कसा राहील ? पोथींत गोपालकाला झाला. त्याच्या चवीसाठीं तर मी आजहि या विज्ञानानें पछाडलेल्या मनानें देखील तेथें ऐकत बसेन.

समाज हा किती सहानुभूतिशून्य व स्वतःतच गुरफटलेला आहे त्याची जसजशी येऊं लागली तसा तसा मी संतांकडे वळलों. घर नसलेल्या माणसानें सार्वजनिक मंदिराकडे वळावें तसा. धर्म आवडत नाहीं-निदान त्याच्याबद्दल फारसा जिव्हाळा नाहीं—तरीहि मला संत व धर्मप्रसंग आवडतात. श्रीकृष्णाची कथा ऐकायला जमलेला भोळा गांव आवडतो. त्या क्षणाला भासापुरतें कां होईना पण एक वेगळें वातावरण तेथें मोहरून आलेलें असतें. तें वातावरण व त्याचा गोडवा नेहमीच्या जीवनांत, सद्याच्या समाजांत औषधालाहि मिळत नाहीं. नेहमीच्या जीवनांतलें मधाचें क्षण टिपणारें जें वाङ्मय त्यापेक्षांहि धर्मप्रसंग मोलाचा आहे. कारण यांत माधुर्य पाखडून वेगळें करावें लागत नाहीं. पुनःप्रत्ययाचीहि भानगड नाहीं. वाङ्मय जो प्रत्यय देतें तो आठवणीसारखा किंवा भासासारखा असतो. येथें त्यावेळेपुरतें एक वेगळें व गोड जीवन प्रत्यक्ष चाखायला मिळतें. तें तसें जीवन वेडगळपणावर, अंधश्रद्धेवर व खोट्या मोक्षकल्पनांवर आधारलेलें असूनहि गोड आहे. कारण येन्हवी मुळींच न मिळणारा गोडवा निदान त्या क्षणांना उमलून आलेला असतो.

आमच्या गांवांत आज जा. कमालीचा स्वार्थ, परस्पर अविश्वास व भीति तेथें वोकाळली आहेसें दिसेल. सावे कोणाला दोन पैसे मागा, मागच्या पांच वर्षांच्या नापिकीचें गाऱ्हाणें अगदीं आकड्यानिशी लोक तुम्हांला सांगतील. दोन क्षण त्यांना सर्वांना एकत्र यायला सांगा. फारच कमी लोकांना तशी सवड होईल. सवड असली तरी अमका तेथें येणार असेल तर आम्ही साफ येणार नाहीं असा रोखठोकपणा ! रस्ते थोडे स्वच्छ ठेवायला सांगा कीं आलीच तुमच्यावर स्वतः लोकसेवकी करण्याची पाळी. गांवाच्या जीवनांत कोठें म्हणून मेळ नाहीं. मनाचें, वागण्याचें, वास्तूचें सौंदर्य नाहीं. वर्षानुवर्षे घालवलेलें हें शेणांतलें जीवन आतां त्यांना आवश्यक झालें आहे. यांतून कोणी त्यांना बाहेर काढलें तर ते मरून, हो मरूनच जातील. आर्थिक अडचणी, विज्ञानाच्या अनेक प्रतिक्रियांचे कांहीं थोडे तुषार इथपर्यंत येऊन या गांवांतील श्रद्धा, भोळेपणा त्यांनीं पार नाहींसा करून टाकले आहेत. फार नसलें तरी थोडेफार सुधारण्याची, एकत्र येण्याची, सुंदर जगण्याची शक्यता पूर्वी त्या भोळेपणांत होती. आता तीहि गेली.

त्यावेळीं गांवांत संत येत. ते येण्याची तारीख ठरलेली नसे. कोणाला तरी संत गांवाच्या शिवेजवळ किंवा जोलवाडी रस्त्यावरच्या








अनुक्रमणिका

**● जीवन-रक्षक**

युद्धासाठीं स्वयंसेवक म्हणून नांव नोंदविलेल्या दोन इसमांना सांगण्यांत आलं कीं, 'तुम्हां दोघांना पोहणं शिकलं पाहिजे.' दोघांनाहि पाण्याची खूप भीति वाटे. ह्यापासून आपली कशी सुटका करून घ्यावी, म्हणून त्यांनीं खूप विचार केला व शेवटीं त्यांनीं एक शक्कल शोधून काढलीच. 'Life-Guards' खात्यांत त्यांनीं आपलीं नांवं ताबडतोब नोंदविलीं ! परीक्षा न घेतां त्या दोघांची एकदम निवड करण्यात आली.

वडाजवळ दिसे. तो माणूस मग वादळ भरल्यासारखा तरंगत धावे. गांवांत त्यानें ही वार्ता एकदोघांना अर्धांमुर्धां सांगण्याचा अवकाश, खिनाभरांतच ती गांवभर होई. भवतीचीं सारीं आवरणें तडा-तड फोडून एखादा महावारा पहाडाशीं झोंबावा तसें कांहींसें तेव्हां घडे. गुढ्या-तोरणें कधीं उभारलीं गेलीं, दुपार असूनहि सडे-आणि तेहि केवळ अंगणांत नव्हे—गल्लीगल्लीवर कधीं शिंपडले गेले, त्यावर रांगोळ्या कधीं रंगल्या—कांहीं कांहीं म्हणून लक्षांत यायला वाव नसे. संत गांवाच्या वावरभर दूर नाहींत तोंवर गांवांतील अख्खे वाद्य व भजनी मंडळी दिंडी-पालखी घेऊन वाजत वाजत तिकडे धांवे.

त्या पालखींत बसणारा तो संत नांवाचा माणूस तेथें बसून गांवभर मिरवण्याच्या लायकीचा आहे कीं नाहीं हा प्रश्न माझ्या मनांत कधींच आला नाहीं. गांवाची अस्मिता, गांवाचें सार्वजनिक जीवनाचें सौंदर्य जागें करण्यासाठीं हवें असणारें मानचिन्ह येवढाच त्या संताचा मी अर्थ घेईन. तो आला नसता तर हें गांव सहा महिन्याच्या बिमारां-सारखें नुसतें भकास व शिथिल राहिलें असतें. संत आला म्हणजे गांवाच्या पोरींची चित्रकला फुलून येई. रांगोळ्यावर रांगोळ्या रंगत. वाटा झाडल्या जात. आपसांतले हेवेदावे विसरले जात.

आमच्या गांवाला संतांनीं आध्यात्मिक उत्थात किती दिलें त्याचा विचार मी कधींच केला नाहीं. रोजच्या जीवनाचें त्यांनीं सोनें केलें. धर्मप्रसंग त्यांत आणून या वखवखत्या क्षणांना पालवी फुटवली हें त्यांतलें अधिक सत्य आहे. पुष्कळ प्रसंगीं तर 'संत' खरोखरच त्या योग्यतेचा नसे. एखाद्या वेड्यालाच संत समजून गांवांत आणलें जाई. आपल्यामुळें अभावितपणें या गांवांतला धर्म जागतो याची त्याला बिचाऱ्याला कल्पनाहि नसे. तरीहि गांव दिवसांपुरते झाडूनपुसून लख्ख होई. गांवांतला कोरडेपणा ओलावून निघे. त्या संतांच्या जयजयकारानं आमचे पांगुळलेले आवाज पल्लेदार होऊन जात.

कल्पनारम्य वाङ्मयांतहि बघायला न मिळणारें सौंदर्य या संतांनीं असें स्वतःच्याहि नकळत दिलें. विशेषतः जेव्हां 'बुद्धी तर्क के छिद्र हुये थे। हृदय हमारा भर न सका' अशी माझी अवस्था नव्हती. त्या काळांत तर मला अशा संतप्रसंगांतून बरेच वरे मिळाले. आज दुःख किंवा आनंद तुलनेनें ठरवणारें मन जागें झालें आहे. वस्तूचें सौंदर्य, जीवनाचीं सुखें ठरवतांना ती संदर्भानें ठरविली जातात. अग्नी हा दाहक आहे कीं अन्न शिजवणारा म्हणून उपकारक आहे याचा तर्क होतो. पण हे तर्क, हे संदर्भ, सुखदुःखाच्या आठवणी वस्तूच्या सौंदर्यावर न चिकटवतां ती पहाण्याचे कांहीं दिवस माणसाच्या आयुष्यांत येतात. ते असतात बाळपणाचे दिवस. त्यांत आगीकडे पाहतांना तिच्या ज्वाला जिभल्या कशा चाटतात, त्या वरखालीं होतांना कशा लपकतात, त्यांची रंगाची तुरेदार शेंदरी कशी कांतिमान आहे हेंच फक्त पाहता येतें. तें पाहतांना जीवनांतील इतर संदर्भांचें आक्रमण आपल्या दृष्टीवर नसतें. त्या वेड्या संतांकडे पाहतांना बाळपणीं माझीहि तीच अवस्था होती. एखाद्या साधूला कपडे नसत. तो नागवा म्हणून सर्वसंगपरित्यागी ! त्याचें कौतुक त्या कारणामुळें होई. आणि त्याच कारणामुळें तो रीतभातहीनाहि ठरे. मला त्या दोन्हीहि नजरा नव्हत्या. त्याच्या नागवेपणाचें कौतुक करण्याची मला गरज नव्हती. मी नव्हतो का नागवा रहात ? आमच्या गांवचीं सारींच मुलें नागवी रहात. पोरीसोरीहि तशाच राहात. त्यांत कमलें करायचें कौतुक ? अन् त्याला नाक तरी कां म्हणून मुरडायचें ? पुन्हां तो वेड्यामारखे हातवारे करी. कोणाला त्यांत परमेश्वरी खुणा दिसत, कोणाला मूर्खपणा दिसे. माझें वय तेव्हां असें होतें कीं मोठ्या माणसाच्या कसल्याहि हातवाऱ्याचा अर्थ तेव्हां मला उमगत नव्हता. म्हणून माझ्यापरीनें ते हातवारे बरे-वाईट अथवा व्यवहारी अर्थ चिकटलेले ठरण्याची शक्यता नव्हती. झाडें ज्या अर्थानें हालतात त्या अर्थानें ते संथ हालत. झाडाच्या झोकांइतकेच तें सुंदर दिसत. त्या संतांमध्यें गोडवा पाहणारी जी मोठ्या मंडळीचीं कारणें होतीं तीं व्यवहारांतून अथवा धर्मांतून जन्म पावली होती. व्यवहार व धर्म काळाच्या तडाख्यांनीं जसजसे बदलत गेले तसतसें संतांचें सोहळेहि कमीअधिक झालें. माझ्यापुरतीं माझीं कारणें मात्र अजूनहि शाबूत आहेत. सध्या संतांचें ते कौतुक नाहीं म्हणून मन भिरभिरत आहे.

धर्म टिकविणाऱ्या-टिकवू पाहणाऱ्या लोकांनीं मोक्ष किती दिला तें माहीत नाहीं. पण चार क्षणापुरतें जीवनाच्या बेंगाला थोपवण्याचें सामर्थ्य मात्र त्या धर्मप्रसंगांत होतें. धर्माच्या कारणांनीं धर्म जगूं शकला नाहीं. मोक्षाच्या आशेनें तो आवडूं शकला नाहीं. माझ्या स्वतःच्या कारणांनीं तो मला आजहि आवडतो. अजूनहि वाटतें, गांवांत संत यावा. त्याची वर्दी चार आठवडे आधीं लागावी. मग गांवांतल्या पडक्या भिंती सावरून बसतील. पांढऱ्या मातीच लेप लेतील. मग त्या भिंतीवर कांहीं बोधवाक्यें चितारलीं जातील. रस्ते वेगानें धुतले जातील. खळगे बुजतील उंचवटे सपाट होतील. उकीरडे धुसमुसळेपणा करणार नाहींत. दमड्या बोपल्याची ढोलक पुन्हा मढेल. फाटलेलें पान जाऊन नवें पान येईल. संतांच्या गोष्टींनीं गांव गुंगून जाईल. झाडावर पोथीचीं पानें हालतील. पहाट वाऱ्याच्या डहाळीवर काकडारतीचे बोल उमलतील. तरणीं, म्हातारी, बाल सारीं शरीरें वर्षेच्या अखंड मंत्रांत न्हाऊन निघतील. मग एक दिवस संत येईल. संत आले घरा। तोचि दिवाळी दसरा ॥ झांज वाजतील. कर्णे निनादतील. डफांचे आवाज घुमतील. टाळमृदुंगाला जीव फुटेल. वातावरणांत गुलाल उधळला जाईल. टोपल्यांनीं कापूर जाळला जाईल. रस्त्यांत संत थांबेल तेथें पुष्पवृष्टी होईल. कमानीला लावलेल्या आम्रपर्णांच्या व झेंडूच्या फुलांच्या तोरणाखालून संत लवून जाईल. गांवभर सुगंधी धूप जाळला जाईल. सण असतो तसें गोडधोड घरोघरीं शिजेल. चौरंगावर संताला न्हाणतील. भजन होईल. आनंदी-आनंद गाजेल.

त्या सोहळ्यामुळें भक्ति उमाळून येईल कीं नाहीं कोणास ठाऊक. निदान मुक्ति, मोक्ष देणारे तरी कांहीं त्यामुळें घडूं नये. घडावें फक्त एक वेगळें जीवन. रंगीत, बहारदार, सुगंधी ! नेहमीपेक्षां ओलें. नेहमीपेक्षां वेगळी आकृती घेतलेलें.

●●●

अनुक्रमणिका

वसंत गांगल

*'मुलं सांभाळताच येणार नाहींत तुला... !' नवऱ्याच्या या उद्‌गारानं तिचं हृदय पिळवटून निघालं. तिच्या मनांत एकाएकी कालवाकालव झाली. आणि मग...*

"अहो, आज ऑफिसमध्यें न गेलं तर चालण्यासारखं आहे कां ?'

'कां ?'

'नाहीं, म्हणजे सासूबाई इथं नाहींत—'

'ती तर महिनाभरासाठीं गेलीय रत्लामला ! ती गांवीं जावून सुद्धां पंधरवडा झाला.'

'तें खरं होऽ! पण–'

'पण काय ?'

'आज रखमाही रजेवर गेलीय !'

'मग काय रखमाचं काम करूं म्हणतेस मी ?'

'तसं नाहीं हो ! अतिपावसानं सुट्टी मिळून तिन्ही मुलं घरींच आहेत आज !'

'मग रखमाला सुट्टी कशाला दिलीस आज ?'

'अहो, रविवारीं मुलं सबंध दिवस घरीं असणार म्हणून तिला म्हटलं सोमवारीं घे रजा-पण आज पाऊस फार पडत असल्यानें नेमकी सुट्टी शाळेला' नि दुपारी कुठं खालीं खेळायलाही पाठवता येणार नाहीं या पावसांत !'

'मग सांभाळ त्यांना एक दिवस. मध्यंतरीं तर तुझ्या क्लबतर्फे भरविण्यांत आलेल्या 'बालरंजन व बालसंगोपन' या क्लासला जात होतीस ना तूं ?'

'हो !'

'त्यांत तूं पहिली आली होतीस म्हणे !'

'मग एक दिवस पोरांना सांभाळतां येत नाहीं ? शेम ! शेम ! बरं मी निघालो. माझा कोट कुठंय ?'

'रखमाऽऽ !'

'रखमाला रजा दिली आहेस ना आज ?'

'मग घ्या कीं तुम्ही तुमचा कोट एक दिवस !'

'मग तुम्हीही द्या कीं एक दिवस आमचा कोट आम्हांला ! इतक्या बारीक सारीक गोष्टीला नोकर कशाला लागतो ? इतकं नोकरांवर अवलंबून कसं चालेल ? मुलं सुद्धां सांभाळतां येत नाहींत स्वतःची !'–दादासाहेब म्हणाले, वहिनींनीं आंत जाऊन कोट दिला आणून दादासाहेबांना आणि म्हटलं -

'इतकं कांहीं टाकून बोलायला नको म्हटलं. आणि आपलीं मुलं असतीं तर गोष्ट निराळी ! दिले असते ४ धपाटे जास्त गडबड केली असती तर ! पण रत्लामच्या जाऊबाई फार आजारी आहेत म्हणून त्यांचा मधु पण इथंच आहे कीं महिनाभर !'

'बरं बरं ! तो काय परक्याचा आहे काय ?'

'तसा नव्हता माझ्या बोलण्याचा अर्थ ! पण उगाच वादविवाद कशाला हवाय ! तुम्ही कामावर जा कसे ! मी सांभाळीन मुलांना. इतका छान जाईल वेळ मुलांचा कीं विचारायची सोय नाहीं !' वहिनींनीं ऐटींत म्हटलें.

'मी आल्यावर रिपोर्ट दे म्हणजे झालं. पण खराखुरा हो. नाहींतर अजय-आशाला विचारावं लागेल मला !' एवढें म्हणून दादासाहेब हंसत हंसत बाहेर पडले.

खरोखरच वहिनींना अलिकडे मुलं सांभाळायला, त्यांना हवं नको बघायला, त्यांचं कौड-कौतुक करायला कधीं वेळ होत नसे नि तशी वेळही येत नसे. मुलं रखमावर किंवा सासुबाईंवर अवलंबून असत–इतकीं कीं कांहीं लागलं सवरलं तरी मुलं कधीं आईजवळ जायचीं नाहींत. तीं जायचीं आजीजवळ नाहींतर रखमाजवळ ! एका दृष्टीनें वहिनींना तें बरेंच वाटे. क्लब आणि सोशल वर्कपुढें त्यांना घरांत बघायला वेळ तरी कुठं होत होता !

आज पतिराजांचे शब्द ऐकून मात्र वहिनींना जरा वाईटच वाटलें. मुलं आपल्याला सांभाळतां येणार नाहींत असें वाटल्यानेच आपण ह्यांना रजा घ्यायला सांगत होतो हेंही त्यांनीं मनोमन कबूल केलें. आतां मात्र त्यांनीं निश्चय केला कीं आज एक दिवस इतकं छान अगदीं आदर्श मातेप्रमाणें वागायचं घरीं कीं ह्यांना नांवें ठेवतां येऊं नयेत व मुलांनींसुद्धां आईवर खूष व्हावें. ह्या आत्मविश्वासानें कामाकडे वळल्या. कपाटांतून रंगीत खडूंचे

गोळे, मेकॅनो, ठोकळे, रंगीत कागद, छोटीशी कागद कापायची कात्री इत्यादि साहित्य काढलें त्यांनीं. तें साहित्य घेऊन अजय–आशा व मधूला जवळ आणून त्या म्हणाल्या, 'मुलांनों, आज बाहेर पाऊस जोरांत पडत आहे. पावसांत जावून भिजलीं तर मुलं आजारी पडतात. म्हणून आज कोणी बाहेर जायचं नाहीं. हा बघा खेळ. हा तुमच्यासाठीं आहे. यानें तुम्हीं खेळायचे. या मातीच्या वस्तु बनवायच्या. ही माती निरनिराळ्या रंगांत असल्यानें हिच्यापासून फळं, पक्षी इत्यादि किती तरी वस्तु बनविता येतात. हे ठोकळे. यांचीं घरं बांधायची. हे कागद आहेत त्याच्या वस्तु बनवायच्या असतात. हा मेकॅनो. चित्रांत दाखविल्याप्रमाणें मेकॅनोचा उपयोग करून वस्तु करायच्या असतात. हीं तारांचीं कोडीं. हीं सोडवायला मजा येते. ही मुलांना खूप आवडतात. खेळा आतां !'

वहिनींची बालसंगोपन–बालरंजन केंद्रांत शिकलेली पोपटपंची म्हणून सुरूं झाली आणि त्यांनीं आपलें कर्तव्य पारं पाडल्याचा निश्वास टाकला. वहिनी आतां निश्चितपणें आपल्या उद्योगास लागल्या. परवांच्या फॅमिली प्लॅनिंगच्या सभेचा अहवाल तयार करायचा होता त्यांना. सासूबाईंना साप्ताहिक पत्र पण लिहायचं होतं. हज्जार कामं होतीं !

थोड्याच वेळांत धाकटी आशा आली आणि तिच्या शाळेच्या गणवेषांतील स्कर्ट मागूं लागली. वहिनींनीं सांगितलें–'अग ओला आहे तो. तो बघ त्या तारेवर वाळत घातलाय. मुलांनीं असा हट्ट करूं नये ! मधूऽ ! बोलावरे आशाला तिकडे !'

मधूनें 'चल आशा, आपण खेळूं या' म्हणून तिला नेल्यावर वहिनींना थोडं हायसं वाटलं. त्यांनीं लेखनसाहित्य काढलं नि अहवाल लिहिण्यास सुरवात केली. मात्र–आशा पुन्हां आली व रडकुंडीला येऊन म्हणाली, 'आईऽ ! मला शाळेचा स्कर्ट दे ना ग माझा !' वहिनी थोड्या चिडल्याच. 'उगाच कांहींतरीच हट्ट असतो तुझा आशे, दिसत नाहीं कां स्कर्ट वाळतोय म्हणून ?'

'मग मला नवा स्कर्ट दे'–आशेनें पर्याय शोधला.

'शहाणीच आहेस ! घरांतल्या घरांत नवीन कपडे असे मळवून टाकायचे असतात वाटतं ! १५ ऑगस्टसाठीं मुद्दाम शिवलाय तो.' वहिनी म्हणाल्या.

'–आम्हांला नको १५ ऑगस्टला नवा स्कर्ट ! आतांच हवा !' आशानें सांगितलें. मुलीच्या पाठींत एक धपाटा घालावा असें वहिनींना तीव्रपणें वाटलें. पण बालमानसशास्त्र त्यांच्या कानांत कुजबुजलें–लहान मुलांना मारूं नये. शारीरिक शिक्षेनें तीं सुधारणार नाहींत. नसत्या गोष्टींचा ती हट्ट घेऊन बसली तर मोठ्या

कौशल्यानें त्यांचें मन वळवावें. त्यांचें मन इतरत्र गुंतविण्याचा प्रयत्न करावा !

'आशा, बाळ तुला टॉफी देऊं कां? कालच तुझ्या मामीनें आणली होती !' आशेचें मन रमविण्यासाठीं वहिनी म्हणाल्या.

'दे !' तात्पुरतें रडें थांबवीत आशा म्हणाली.

टॉफी खात खात आशा अजित-मधुकडे जाऊन टुकटुक माकड करूं लागली त्यांना. मग व्हायचं तेंच झालं. अजितनं तिच्या हातून टॉफी ओढून घेतली ! पुन्हां रडारड ! शेवटीं तिघांनाही भरपूर टॉफी देवून गप्प करून हुश्श करीत वहिनींनीं लिहावयास सुरवात केली.

पण त्यांची ही लेखनसमाधि फार काळ टिकूं शकली नाहीं. कांहींवेळानं अचानकपणें मागून त्यांच्या गळ्याभोंवती लाडिक छोटे हात पडले व तंद्री भंग पावल्यानें व त्या धक्क्यानें कागदावर शाईचा ठिपका पडल्यानें त्या बेचैन झाल्या. आपल्या गळ्यांतील आशाचे हात काढीत त्यांनीं तिला विचारलें. 'हं. आतां आणखी काय हवंय ?' तिच्या मागोमाग अजित-मधु आलेलेही त्यांनीं पाहिलं.

'स्कर्ट हवाय आम्हांला !' आशानें लाडिकपणें मागणी केली.

'कार्टी मला खाईल तेव्हां गप्प राहील !' त्या पुटपुटल्या.

'मी ग कशी खाईन तुला ?' आशानें विचारलें व पुढें म्हणाली, 'तूं केवढी तरी मोठ्ठी आहेस ! आणि शिवाय मी कांहीं राक्षस नाहीं माणसांना खायला ! शिवाय आमच्या मास्तरांनीं सांगितलंय कीं राक्षस खरेखुरे नसतातच म्हणून !'

'एऽहेऽहेऽ ! असतातच मुळीं राक्षस. आणि चेटकिणी आणि भुतं सुद्धां !' अजितनें युद्धाला आव्हान दिलें.

'कशावरून ?'

'हिमकन्येलें नाहीं कां ती चेटकीण राणी ठार मारण्याचा प्रयत्न करीत ! आणि आकाशांत उंचावर महाल असलेला राक्षस नाहीं कां जादूच्या घेवड्याच्या वेलीवरून चढून त्याच्याकडे गेलेल्या जगूला नाहिसं करण्याचा प्रयत्न करीत !'–अजितनें दाखले दिले.

'अरे पण तें नाटकांत पाहिलं आपण ! नाटक होतं तें ! खरं नव्हतं कांहीं !' मधूनें आशाची बाजू घेतली.

'नाहीं. तसं नाहीं कांहीं ! जें खरं खुरं घडलं होतं पूर्वी तेंच दाखवलंय नाटकांत !' अजित.

'नाहींच मुळीं'–आशा.

'होयचं मुळीं'–अजित.

'नाहींच मुळीं,–आशा.

'होयचं मुळीं ! आणि रखमा नव्हती का सांगत त्या आंग्रे वाड्याच्या मागील पडक्या विहिरींत भूत आहे म्हणून !' अजितनें रखमाचें म्हणणें सांगितलें.

'कसलं आलंय भूत नि बीत !' मधु म्हणाला, 'आमचे मास्तर म्हणतात–'

'ॲमचे मॉस्तर म्हणतॅत !' अजितनें मधूस वेडावले, सारखे काय आमचे मास्तर घेऊन बसतोस !'

'आहेतच मुळीं ते चांगलें !'

'हं ! त्यांना भूत भेटलं नसेल म्हणून—'

'पण नाहींच आहे भूत !'

'राक्षस नसतात म्हणे–' आशा म्हणाली–'पण भूत असतं कीं नाहीं कोण जाणे. पण त्या पडक्या विहिरीजवळ जायला मला तरी बाई भीति वाटते.'–आशानें बाजू बदलली होती.

मधु म्हणाला–'भित्री भागूबाई ! मी आत्तां जाऊन दाखवतो तिथं !'

'वा ! रात्रीं येतात म्हणे तिथं भूतं !'

'रात्रीं काय नि दिवसा काय ? रात्रीं असलीं तर आतां असतीलच पैज आपली ! मी जाऊन येतो !' मधु इरेस पेटला होता.

'कांहीं नाहीं कुठं पावसांतनं जायचं, मधु ! आजारी पडायचं कां ?' वहिनी कडाडल्या—, 'आणि आतां गडबड बंद ! मला काम करायचंय. तीन वाजून गेले आहेत. स्वयंपाकघरांत दुभत्याच्या कपाटांत ठेवलेलें दूध प्या नि बाहेरच्या खोलींत जावून खेळा.'

मधूनें पुढाकार घेतला. नऊ वर्षांचाच असला तरी त्या तिघांत मोठा होता. 'चला रे, आपण दूध घेऊं या आणि बाहेरच्या हॉलमध्यें खेळूं या—म्हणजे काकूला त्रास नाहीं होणार !'

एरवीं मधूच्या लीडरशीपबद्दल त्याच्याशीं भांडणारा अजित सुद्धां आज मुकाट्यानें स्वयंपाकघरांत गेला. आशाला तर त्या दोघांच्या पावलावर पाऊल टाकून वागायची फार आवड ! तीही त्यांच्या मागोमाग गेली.

दूध घेतल्यावर उतरल्या तोंडानें व पाय न वाजविण्याचा प्रयत्न करीत तिघंही वहिनींच्या अंगावरून हॉलमध्यें आलीं व गुपचूप खेळूं लागलीं. वहिनींना आतां मुलांचा आवाज ऐकूं येत नव्हता—त्यांचा त्रास होत नव्हता पण त्यांच्या हातून काम मात्र होईना. मुलांची गोरीमोरी तोंडं पाहून त्यांची समजूत घालण्याचाही मोह त्यांना एकदां झाला होता. पण आधीं रागवायचें व दुसऱ्या क्षणीं खाऊ द्यायचा–अशा वागण्यानें आईवडिलांचा मुलांवर धाक रहात नाहीं असें त्यांनीं अभ्यासिलें होतें. त्या गप्प बसून लिहिण्याचा निष्फळ प्रयत्न करूं लागल्या.

इतक्यांत. दाराची बेल वाजली. त्यांच्या कामांतील हा अडथळा त्यांना स्वागतार्ह वाटला. त्यांनीं घाईघाईनें दार उघडलें. १० वीच्या वर्गांत शिकत असलेली त्यांची भाची मृणाल आली होती.

'आज आतां कशी आलीस, मृणाल ?' वहिनींनीं विचारलें.

'आज आमच्या शाळेला अतिपर्जन्यवर्षावानें सुट्टी मिळाली ना ! मग दुपारी थोडा अभ्यास केला आणि म्हटलं जावं थोडा वेळ अजित – आशाशीं खेळायला !' मृणालनें सांगितलें.

मृणालचा आवाज ऐकतांच इतका वेळ फुरंगटून बसलेल्या तिघांच्याही कळ्या फुलल्या होत्या, पण एकट्या आशेखेरीज मृणालवर आनंदानें झेंप कोणींच घेतली नव्हती. 'मृणालताई आली, मृणालताई आली' अशा तिनं केलेल्या गोंगाटाला अजित-मधूची सांथ न मिळाल्यानें तिच्या लक्षांत आलें कीं आई आपल्यावर रागावली आहे. ती गप्प झाली.

हं काय आशाराणी ! आज डोळ्यांतलं काजळ गालावर कसं पसरलं ?' असं आशाला विचारून तिनं वहिनींना म्हटलं, 'मी हॉलमध्यें आहे ग ! मुलांशीं खेळतेय जरा.'

थोड्याच वेळांत हॉलमधून हंसण्या-खिदळण्याचा आवाज ऐकूं आला. वहिनींना थोडा रागच आला. एवढं साहित्य खेळायला दिलं होतं, जेवतेवेळीं मोरंबा वाढला होता, टॉफी दिली होती तरी इतका वेळ मुलांचीं तोंडं वाईटच होती. शिवाय सारखी कांहींना कांहीं तक्रार होतीच ! जसं आईला त्रास देण्यासाठींच जन्मली होती ! आतां कशी खेळत होती मृणाल बरोबर !–त्यांना थोडा हेवाही वाटला. त्या हॉलच्या दाराच्या पडद्याआड जाऊन उभ्या राहिल्या.

त्यांनीं खेळायला दिलेल्या साहित्यांतून तीन पलंग बनले होते–तीन खुर्च्या, तीन ताटं, तीन वाट्या तयार झाल्या होत्या. 'तीन अस्वलं





अनुक्रमणिका

नि सुरेखा' या गोष्टीचा खेळ खेळत होतीं मुलं. छोटं अस्वल होण्यासाठीं साऱ्यांचीं भांडणं! कारण छोट्या अस्वलाच्या वाटींतील दूध सुरेखा पिऊन टाकते, त्याच्या छोट्या खुर्चीवर बसते, छोट्या पलंगावर झोंपते!–म्हणजे छोट्या अस्वलाला बोलायला पुष्कळ होतं नि अभिनय करायला सुद्धां! शेवटीं पहिला मान मिळाला मृणालला! आशा झाली होती सुरेखा. मग आशानं आपल्या हातांतल्या छोट्या ठोकळ्याच्या तोंडाला वाटी लावली, त्याला पाटावर जेवायला बसवलं, खुर्चीवर बसवून खुर्ची वाकडी तिकडी करून टाकली. प्रेक्षक आणि काम करणारे एकच असल्यानें 'ए ए, तें बघ सुरेखा छोटूचं दूध पिऊन टाकते! जेवण जेवते!!' असे उद्‌गार ऐकूं येत होते. मग तिन्ही अस्वलं आलीं. मोठा ठोकळा घेतलेला मधु, मधला ठोकळा घेतलेला अजित नि त्या दोघाच्या पाठोपाठ छोटा ठोकळा घेतलेली मृणाल! मृणाल ऊर्फ छोटु अस्वल मधु ऊर्फ बडेदादाला म्हणजे मोठ्या अस्वलाला म्हणाली–'अऽ अंऽऽ अंऽऽ! बडेदादा बडेदादा, माझ्या खुर्चीवर कोणीतरी येऊन बसलं होतं!'......

नाटक रंगांत येत होतं. एक प्रयोग संपल्यांवर दुसरा प्रयोग होत होता. मृणालनंतर मधु छोटं अस्वल झाला–मग अजित–मग आशा! वहिनी काहींशा अंतर्मुख बनल्या. त्या विचार करूं लागल्या–आपण नुसतें मुलांना खेळायचें सामान देऊन त्याच्या उपयोगाबद्दल एक व्याख्यान सुनवून मोकळें झालों. त्यामुळेंच वस्तूविषयीं आवड निर्माण होण्याएवजीं अप्रीत निर्माण झाली मुलांच्या मनांत! तेंच आपण थोडावेळ त्यांच्यात खेळलों असतो तर? त्यांना दिलेल्या साहित्यांतून एखादी गोष्ट बनवून दाखविली असती तर?—

आतां त्यांना मुलांची गमावलेली श्रद्धा परत मिळवावीशी वाटूं लागली. मुलांना आवडणारे बेसनाचे लाडू एका ताटलींत घेऊन त्या हॉलमध्यें शिरल्या. त्यांच्याकडे लक्ष जाताच मुलानें आवाज थंडावले. पण त्याच पुढें येऊन म्हणाल्या, 'सुरेखा होईल ना तिनं बेसनाचा लाडू खायचा हं एक! बेसनाचा लाडू म्हणजे छोटू अस्वलाचे जेवण! कबूल? आपली आईच हें बोलतय कां? अशा आश्चर्यानें अजित–आशानें त्यांच्याकडे पाहिलें. मात्र बेसनाच्या लाडूनें दोन्ही पक्षांत तहनामा झाला होता. उदार मनानें त्यांनीं आपला खेळ पाहाण्याची आईला संधि दिली. आईनें प्रेक्षकाचें काम पत्करलें. मधूनच मिळणाऱ्या प्रोत्साहक टाळ्यांनीं नाटक जास्तीच रंगत होतें.

पांच वाजण्याच्या सुमारास मृणाल घरीं जायला निघाली तेव्हां मुलं खट्टु झालीं. उद्यां संध्याकाळीं येण्याच्या बोलीवर तिची सुटका झाली. ती गेल्यावर खेळ थंडावला–कारण एक पात्र कमी पडत होतें. तिघंही आपल्या तिन्ही पलंग-खुर्च्यांकडे पाहूं लागले.

वहिनींनीं विचारलें–'कायरे, आपण पलंगांसाठीं बेडकव्हर्स करूं या कां?'

'तीं कशीं करणार?'—आशा.

'रंगीत कागद आहेत कीं आपल्याजवळ!'–वहिनी.

'हो हो करूं या!'—अजित.

'अन् खुर्चीवरही आसनं करूं या–!' मधु.

भराभर कागदाचीं बेडकव्हर्स झालीं. डींक आणला गेला. मधूला बेडकव्हर्सवर डिझाईन करायचं होतं. खुर्चीचीं आसनंही तयार झालीं. पाट तयार होऊं लागले. पाटावर लावण्यासाठीं चंदेरी रंगाच्या फुल्या तयार झाल्या.

इतक्यांत स्फूर्ति आल्यासारखी आशा ओरडली, 'आईऽ. तूं येतेस खेळायला अस्वलाचा खेळ?'

खरं म्हणजे अजित–मधूच्या मनांतही ही कल्पना केव्हांच डोकावली होती, परंतु वहिनींच्या रागाच्या भीतीनें दोघंही गप्प बसले होते. आतां आशानें प्रश्न विचारल्यावर तिघंही त्यांच्याकडे आतुरल्या नजरेनं पाहूं लागलीं! वहिनींना मनातून आनंद झाला. मुलांनीं त्यांना आपल्यांत खेळायला बोलावूंन त्यांना आपल्या विश्वात सहभागी करून घेतलं होतं. त्यांनीं विजय मिळविला होता! वरवर मात्र त्या म्हणाल्या, 'अरे पण मला जमेल कां तें?'–'होऽऽ!' एकदम सर्वांचा होकार आला.

काहीं वेळानं घड्याळाकडे लक्ष जातांच त्या दचकल्या. सहा वाजायला आले होते. ७ वाजतां दादासाहेब घरीं येत असत.

'आतां खेळ थांबवूं या आपण!' त्या म्हणाल्या.

'का?'

'अं अं अं!'

'आतां थोड्यावेळानें बाबा नाहीं कां येणार?'—त्या म्हणाल्या.

'खरंच कीं!' मधूला मान्य झालें.

'ए, आतां आपण लास्ट डाव खेळूं या.

'आणि आतां आईला छोटू करूं या' आशा—

'मान्य! पण दोन अटींवर!' वहिनींनीं सांगितलें.

'कोणत्या?'

'खेळणं झाल्यावर बाबा येण्यापूर्वीं सारा हॉल स्वच्छ करून टाकायचा नि हातपाय तोंड स्वच्छ धुवून कपडे बदलायचे. ही झाली पहिली अट! अन् दुसरी अट म्हणजे आशा दुपारीं स्कर्टसाठीं हटून कां बसली होती तें सांगायचं!'

'त्याचं असं झालं काकू—'

'अग आई, चोरशिपाई खेळत होतो आम्ही!'

'मग?' वहिनींनीं विचारलें.

'हा मधु झाला होता चोर नि मी नि अजित शिपाई!'

'मग त्यासाठीं शाळेचा स्कर्ट कशाला हवा होता?'–वहिनी.

'अग त्यावर लाल पट्टा बांधायचा होता मला नि त्यावर दंडुका!'

'लाल पट्टा तुझ्या ह्या फ्रॉकवर नसता कां बांधतां आला वेडाबाई?' वहिनींनी विचारलें.

'पण आमचा पोलिसाचा गणवेष होता कीं'—

'निळी हाफ पँट किंवा स्कर्ट नि त्यावर लाल पट्टा!'

'मग तसं काय झालं होतं सांगायला!'

'आम्हांला वाटलं तूं ओरडशील!'

'ए आशा, मला वाटतं तूं सांगितलं असतंस तर नसती ओरडली आई!'

'होय कां ग आई!'

'अग काकूला काय विचारतेस, मला ठाऊक आहे, नसतीच ओरडली काकू. नाहींतर ती आतां आपल्यांत खेळायला कशी आली असती? मुलांवर उगाच ओरडणारीं माणसं मुलांत नाहीं खेळत!'

'मघाशीं काम होतं आईला! नि आपण उगाच हट्ट करत होतो म्हणून ओरडली!'

'खरंच कां ग आई? किती चांगली आहे नाहीं आपली आई!' आपल्या प्रश्नाला होकार मिळण्यापूर्वींच पुढचं वाक्य म्हणून आशानें वहिनींच्या गळ्यांत मिठी मारली.

●●●






# न | वें | प्रा | तः | स्म | र | ण

—चंद्रकांत इंदापूरकर

*तींच तीं प्रात:स्मरणें म्हणून तुम्हीं कंटाळलां असल्यास त्रिविक्रमानें केलेलें हें नवें 'त्रिविक्रमी' प्रात:-स्मरण वाचा. करमणूक होईलच; पण हें चांगलें कीं तें पूर्वीचीं चांगलीं या संभ्रमांत क्षणभर पडाल...*

**मोठेपणा** आणि 'लोकप्रियता यांचा क्वचित्‌च संगम होतो असें म्हणतात. मोठं मंत्रीपद प्राप्त झालं कीं त्याच्याबरोबरच लोकांकडचा भरसभेमधला जोड्यांचा प्रसादहि सुरू होतो. लठ्ठ पगाराची सरकारी नोकरी मिळाली कीं मठ्ठ लोकांचा कांहींतरी खुसपट काढून त्या अधिकाऱ्याला बदनाम करण्याचा प्रयत्नहि चालू होतोच. पण त्रिविक्रम मात्र ह्याला अपवाद होता. वाघ आणि शेळी ह्यांना सारख्याच ममतेनें वागण्याचें कौशल्य त्याला साधलें होतें. त्यामुळें मोठेपणा त्याला पंख्यानें मंद मंद वारा घालीत, असे तर लोकप्रियता नाजूक हातानें त्याचे पाय चेपत बसे. त्रिविक्रमानें ही अजब करामत, खरोखरच प्रत्यक्ष करून दाखवली होती. मंत्री होऊनहि लोकांच्या गळ्यांतला तो ताईत बनून गेला होता.

अर्थात त्याच्या ह्या लोकप्रियतेमागे मोठें रहस्य होतें. लोकांना कसें आकर्षित करून घ्यावें ह्याचें त्यानें एक तंत्र बसविलें होतें. त्या तंत्राचा उपयोग करून लोकांचीं मनं त्यानं आपल्या कब्जांत पुरतीं आणलीं होतीं. आमच्या लोकांना व्यावहारिक उपदेश करण्यापेक्षां गोड सल्ला द्यावा असें तो आपल्या सहकारी मंत्र्यांना नेहमीं सांगत असे. हा सल्लाहि धार्मिक किंवा तात्त्विक बैठकीवरून दिल्यास लोकांचीं मनं सहज खेचून घेतां येतील असा त्याचा विश्वास होता. म्हणूनच दारूबंदीवर एकाद्या सभांतात जोराची व्याख्यानांची फैरी झोडली तरी रात्रीं सामाजिक नेत्यांच्या व सरकारी अधिकाऱ्यांच्या अनौपचारिक बैठकींत 'प्याल्यानें होत आहे रे, आधीं प्यालेंच पाहिजे' असा तेजस्वी आदर्श तो देई. त्याच्या बरोबरच 'क्रियेविण वाचाळतां व्यर्थ होय' असें म्हणून प्रत्यक्ष सामुदायिक कृतीहि होई. तेव्हां त्या सर्व समाजधुरंधरांना तो आपल्या मायबाप सरकारचा सच्चा प्रतिनिधि वाटल्यावांचून राहत नसे. एकदां कॉलेज तरुणांपुढें व्याख्यान देतांना 'फुटो हें मस्तक, तुटो हें शरीर। पोरीचा पदर सोडूं नये' अशी गर्जना त्यानें करतांच सारे विद्यार्थी त्याला नुसतं डोक्यावर घेऊन नाचले. आपल्या पक्षाच्या एका बैठकींत पक्षाच्या लांचखाऊ वृत्तीवर टीका करणाऱ्या, नादान बिभीषणांना त्यानें सडेतोड उत्तर दिलें- (लाच) खाल तर तुमच्यासह, न खाल तर तुमच्या शिवाय आणि विरोधाल तर तुम्हांलाहि विरोधून आमचा हा खाण्याचा कार्यक्रम आम्ही पुढें चालू ठेवूंच. यामुळें कांहीं हाताच्या बोटावर मोजण्याइतकें पक्षांतील लोक त्याच्यावर नाराज झाले परंतु पक्षाचें हुकमी बहुमत त्यालाच मिळालें. अशा प्रकारें, खेड्यांतील गांवठी समाज असो कीं शहरांतील सुशिक्षित कॉलेज युवक असो, दोन पैसे मिळवणारे अडाणी कामगार असोत कीं बड्या पगाराचे सरकारी नोकर असोत—त्रिविक्रम म्हणजे सगळ्यांना हवासा वाटे. त्याचं बोलणं साऱ्यांना अगदीं गोड लागे—खूप खूप ऐकावसं वाटे.

देशाच्या निरनिराळ्या प्रश्नांचा विचार करतांनाहि त्रिविक्रमानं आपला हा धार्मिक उपयुक्ततावाद लोकांच्या समोर कौशल्यानें ठेवला. स्वातंत्र्योत्तर कालांत आपल्या देशाची म्हणावी तशी प्रगति होऊं शकली नाहीं हें इतरांप्रमाणेंच त्रिविक्रमालाहि पूर्णपणें मान्य होतें. त्याचें प्रमुख कारण, त्याच्या मतानें आमची श्रद्धाहीन मनोवृत्ति हेंच होय. कशावरहि निष्ठा ठेवायची नाहीं व कोणाचाहि मनोभावानें प्रार्थना करावयाची नाहीं, अशी तर आमची आजकाल वृत्ति बनली आहे. मग कल्याण होणार तरी कसें आमचें ? आतां प्रार्थना करण्यासाठीं तींच जुनीं पुराणीं दैवतं पाहिजेत आणि भसाड्या सुरात त्याच्या त्याच ओबडधोबड भूपाळ्या किंवा डरकाळ्या म्हटल्या जाव्यात हें त्याला बिल्कूल पसंत

नाहीं. नुस्त्या देव-देवतांबद्दल एक प्रकारचा तिरस्कारच त्रिविक्रमाला आहे. गणपति म्हणजे महान् देहाचं एक धूड! शिव शंकर म्हणजे नंगा नाच करणारं एक अकाळ विक्राळ व अचाट भूत! बेंबीवर कमळाची नळी मिरवणारा 'अवतार' म्हणजे भगवान विष्णू! सारें शरीर नेत्रांनीं मारवलेला इंद्र म्हणजे पोळ्याच्या दिवशीं पुरता रंगीबेरंगी केलेला पोळच. अशा ह्या साऱ्या देवांचें अद्वितीय सौंदर्य पाहिलें कीं त्रिविक्रमाला कशीं शिसारी येई. त्याला जास्त आश्चर्य वाटे तें त्यांच्या बायकांचें. कशें बुवा त्यांनीं ह्यांना पसंत केलें—विचार करकरूनहि हें कोडें कांहीं त्याला सुटत नसे. चौसष्ठ वर्षें तप करून तीन डोळ्यांचा जंगली प्राणी गळ्यांत बांधून घेणाऱ्या पार्वतीला किंवा मेघासारख्या काळ्याकुट्ट कृष्णाबरोबर पळून जाणाऱ्या रुक्मिणीला काय म्हणावें हेंच त्याला कळत नाहीं. विवाह मार्गदर्शनाची खरी आवश्यकता त्या काळापासूनच आम्हांला आहे असें उगाच नाहीं तो आग्रहानें सांगत.

तेव्हां ह्या भयाण देवतांचें लोकांना विस्मरण पडलें ह्याचें त्याला दुःख होत नाहीं. उलट सकाळच्यावेळीं 'सिलोन' रेडिओवरून येणारी कर्णमधूर संगीताची लहर तोडींत एकादा ज्ञानेश्वरींतल्या ओव्या किंवा शंकराचार्यांची चर्पटपंजिरी म्हणूं लागला तर त्याची पायाची आग मस्तकाला जाते. प्रार्थना करा; प्रातःस्मरण करा, पण ते भूलोकीच्या देवतांचे. भौतिक सुखाची वृद्धि करून देईल व तीहि ताबडतोब—तो खरा देव! 'मी हा रंजला गांजला। मला म्हणे जो आपुला। तोचि साधु ओळखावा। देव तेथेंचि जाणावा॥' असें त्रिविक्रम ठासून ठासून बजावतो. असे देव शोधण्यासाठीं वनांत जावें लागत नाहीं. बेंबीच्या देठापासून ओरडून त्याची प्रार्थना करावी लागत नाहीं. आकाशाच्या पलीकडे किंवा समुद्राच्या तळाशीं ते दडलेले नसतात. तर तुमच्या आमच्या भोंवती मानवी वेषांत ते फिरत असतात. तुमची आमची सेवा करीत असतात. आम्ही मात्र जाणून बुजून त्यांच्याकडे दुर्लक्ष करतो, त्यांची अवहेलना करतो. धर्मराजाच्या पत्रावळी उचलणाऱ्या श्रीकृष्णांत आम्हांला देवत्वाचा साक्षात्कार होतो पण रोज घरांत आमची उष्टी काढणाऱ्या पत्नीरूपी देवीचें दिव्यत्व आम्ही कधीं पाहतच नाहीं. इकडचा निरोप तिकडे पोंहचता करणारा देवांचा पोस्टमन 'नारद' देवर्षि मानला जातो, त्याची फुलांनीं पूजा केली जाते पण आम्हांला गोड गुलाबी पत्र देणारा पोस्टमन, नव्हे देवर्षींचा देवर्षि...हाय! गोड शब्द देखील त्यांच्या तोंडावर कधीं फेकला जात नाहीं. नदीचे तरंग पाहून कुठं सप्तपाताळांत दडलेल्या जलदेवतेचे लगेच आम्हांला स्मरण होतें परंतु रस्त्यांतून केरांचे तरंग दूर करणाऱ्या देवतेकडे कधीं आम्ही डोळा वर करून (निदान बायकोचा डोळा नसतांना तरी) पाहतों काय? तिची कधीं थोडीशी स्तुति करतो काय? सर्वच देवता स्तुतिप्रिय असतात. मग ह्या देवतांना स्तुति कशी नकोशी वाटेल? पण ह्याचा कुठं आम्ही विचार करतों? उलट धूळ फार उडवली म्हणून *ग्रामदेवतेला, किंवा भाजींत तिखट फार पडलें म्हणून *पाकदेवतेला दोष द्यायला तयार. काय हा धर्मभ्रष्टपणा! केवढा हा पाखंडीपणा! काय ही पशुता! उगाच नाहीं तुकाराम महाराज म्हणत—'

कठिण हृदय तया चांडाळाचें।
जो नेणें पराचें दुःख कांहीं॥

* ग्राम्य शब्द १ झाडूवाली, २ स्वयंपाकीण.

या देवतांची, त्याच्या मतानें प्रार्थना करणें आवश्यक आहे. सकाळीं उठल्यानंतर प्रथमतः या देवतांना आळविलें नाहीं तर सारा दिवस वाईटच जाणार. त्यांतच चिडून या देवतांनीं उग्र स्वरूप धारण केलें तर 'दे माय धरणी ठाय' अशी आपली स्थिती होईल. म्हणूनच प्रातःकाळीं अत्यंत मनोभावानें ह्यांचें प्रातःस्मरण केलें पाहिजे. तें कशा रीतीनें करावें ह्याचे नमुने त्रिविक्रमानें आपल्या स्तोत्रावलींत दिले आहेत. त्यापैकीं कांहीं येथें उद्धृत केले जात आहेत.

### दूधवाला भय्याजी

'आम्हां घरीं एक बैल दूभताहे।
पान्हा न समाये त्रिभुवनीं॥
वान काळाकुट्ट नांव ते भय्याजी
चरे गांवामाजी खाली मजल्यांवर॥

अशा गोड अभंगांत हे दुग्धेश्वरा तुला प्राचीन संतमुनींनीं आळविलें आहे ना? ये, हे राजस गोंडस प्राण्या आपल्या मिशा पिंजारीत तूं सकाळच्या रम्य वेळीं ये. हातांतल्या बरण्यांचा धाडधाड आवाज करीत व 'बाई दूध घ्या' अशी डरकाळी फोडीत तूं आलास कीं किती हायसे वाटतें म्हणून सांगूं. आमच्या घरांत सारेजण तुझी रोज सकाळीं अगदीं डोळ्यांत प्राण आणून वाट पहात असतात. घरांत खरकट्या भांड्यांची आदळआपट करीत श्रीमतीजी (लाडीक रागांत) म्हणत असते—'अजून मेला दूधवाला कसा आला नाहीं?' छोटा पोरगा बोबड्या स्वरांत विचारीत असतो—'बाबा, दूधवाला उशील लावतोय आज. अजून त्याचं पानी घालून संपलं नसल नाहीं?' आणि मी 'वाटुली पाहतां सिणले डोळुले। दाविसी पाउलें कै वो डोळा। तूं माय माउली कृपेची साउली। भय्याजी पहिली वास तुझी। असा जप करीत

भरल्या डोळ्यानें तुझ्या मार्गाकडे पाहत असतो. सकाळच्या दोन तासांच्या (सहा ते आठ) प्राणांतिक उपोषणामुळें जीव घाबरा होऊन गेलेला असतो. शरीरांतल्या प्रत्येक, रोमारोमांतून ध्वनि येत असतो–'चहा! चहा!' बुद्धि म्हणत असते–'चहा कुठं आहे?' मन उत्तर देतें–मिळेल. जरा संयम राख. आतां तो दूधवाला भय्याजी येईल आणि मग तुझी तृष्णा हां हां म्हणता हरण केली जाईल.' मी सारखा 'भय्याजी, भय्याजी–का रे नाठविसी चहाळु मजसी' असा मंत्र घोषीत असतो. तोंच...

ऐन दुष्काळच्यावेळीं आकाशांत अवचितपणें एकादा काळाकुट्ट मेघ भयानक गर्जना करीत यावा तसा तूं येतोस. तुझ्या भेसूररम्य गर्जनेनें काळीज कसें थरारून जातें. 'दूध, बाई, बाई, बाई'...तुझ्या किंकाळया गल्लींत फोडल्या जातात. दुधापेक्षां 'बाई'चा ध्वनी तूं अधिक कां करतोस तें अद्याप मला कळलें नाहीं. पण त्यामुळें साऱ्या घरांत कसें चैतन्य खेळूं लागतें. पदर सावरीत, भांडं घेऊन बाई येईपर्यंत तूं आपल्या कोमल बुक्क्यांनीं दारांची मोठी शोचनीय अवस्था करून ठेवतोस आणि मग तुझ्या त्या दिव्य बरणींतून तूं तो दुधाचा प्रवाह सोडतोस. अहाहा! खरोखरच तुझी बरणी किती अद्‌भुत आहे! चिंतामणि किंवा कल्पवृक्ष ह्यांचा काय पाड तिच्यासमोर? केव्हांहि पहा—ही बरणी कशी भरलेली असते! कितीहि लोक दूध मागोत—हिचा अंत कधीं लागत नाहीं. म्हैस असो किंवा नसो, दुष्काळ पडो कीं महादुष्काळ येवो—ह्या बरणीवर त्याचा परिणाम नाहीं. ती तोंडापर्यंत गच्च भरलेली असते ती असतेच. कधीं म्युनिसिपालटीच्या नळांनाच पाणी आलें नाहीं तर मात्र बरणीची केंविलवाणी अवस्था होते. परंतु यावरून कांहीं नास्तिक पाखंडी 'तूं दुधांत पाणी मिळवतोस' असें म्हणून सत्याचा अलाप करतात हें ठीक नाहीं. म्हणूनच, तुका म्हणे नासी! कुतर्क्यांचें कपाळीं!

हे दुग्धेश्वरा, माझी मात्र तुझ्यावर पूर्ण भक्ति आहे. सकाळच्या प्रहरीं तुझ्या पल्लेदार मिशा दिसल्या नाहींत कीं माझे प्राण कंठाशी आले म्हणून समज. तूं नाहींस कीं दूध नांवाचा पदार्थ नाहीं, दूध नाहीं कीं चहा नाहीं आणि चहा नसल्यावर या भूलोकावर जिवंत तरी कोण राहील? हे दूधो माउली, मग या लेकरास तूं पाजशील ना?

'तूं माउली हून मायाळ। चंद्राहूनि शीतळ।
पाणियाहूनि पातळ। दूधं, आण। आणि

या चहातें लेकरास वांचव.

**शेजारी**

'देऊं कशाची उपमा। तुजी तुज पुरुषोत्तमा!' खरोखर हे महेश्वरा, तुझं चिंतन करूं लागलों कीं अशी माझ्या मनाची केंविल्वाणी स्थिति होते. 'मनवाचातीत तुझें हें स्वरूप' असें तुझें वर्णन केलं जातें तें उगीच नव्हे? खरोखर तूं दृष्टीस कधीं पडणार नाहींस. कानांनीं कधीं ऐकूं येणार नाहींस, पण तूं करशील त्याला कांहीं आदि अंत नाहींच. कधीं कधीं एका क्षणांत माझ्या पाठीमागच्या गच्चीवर फोलपटांचा ढीग पडलेला असतो किंवा स्वयंपाकघरांतल्या भिंतींतून अचानक भिंत फोडण्याचा प्रयत्न करणाऱ्या मराठ्यांच्या सैनिकाप्रमाणें कांहीं भले मोठे खिळे मातीची वृष्टि करत आगमन करूं लागतात. आमच्या दोरीवरचे कपडे क्षणार्धात एकाचवेळीं नाहींसे होतात नि श्रीकृष्णांनीं वस्त्र लांबविलेल्या गोपीप्रमाणें त्या दोरीची शोचनीय अवस्था होते. हे सारे चमत्कार तुझ्याशिवाय कोण करूं शकणार? तुझ्या या अद्‌भुत लीला पाहून मी उद्‌गारतों—

'नमः पुरस्ताद् अथ पृष्ठतस्ते,
नमो नमस्तेतु सहस्रकृत्वा।'

हे दिव्य शेजाऱ्या, म्हणूनच मी तुला नम्रपणें साष्टांग प्रणिपात घालतों. तुझी कृपादृष्टी नेहमींच माझ्यावर असूं दे. तूं रागवायला लागलास कीं मला कांपरे भरतें. तुझी भृकुटी वर चढली कीं माझा जीव खालीवर होऊं लागतो. तुझ्या डोळ्यांत लाली दिसूं लागली कीं माझ्या पायांत गोळे येऊं लागतात. तुझ्या अक्राळविक्राळ स्वरूपाची नुसती कल्पना आली कीं माझ्या शरीराचे कांपरे कांपरे झाल्याखेरीज राहत नाहीं. खरोखरच 'भयेन च प्रव्यथितं मनो मे।' हे त्रस्त शेजाऱ्या म्हणून तूं शांत हो.

तुला काय पाहिजे तें मागून घे. काय वाटेल तें तूं कर पण असा क्रोधित होऊं नकोस. माझ्याकडून उधार घेतलेले पैसे तूं परत करूं नकोस. माझे भट्टीचे कपडे पहिल्या दिवशीं तूं वापरत जा. माझा रेडिओ तूं दिवसभर ऐकत बस. माझ्याकडे रोज सकाळीं व दुपारीं चहाला येत जा. फार काय माझ्या पोरींबरोबर सिनेमाला जात जा. पण कृपा करून त्या क्रुद्ध मुद्रेनें तूं मजकडे पाहूं नकोस व माझ्यावर रागावूं नकोस.

'मी तंव अनाथ अपराधी। कर्महीन मतिमंद बुद्धि
तुज म्या आठवले नाही कधी। शेजारच्या
कृपानिधि मायबापा। चहा पितांना गोरे
खातांना। बायकोशीं गप्पा मारतांना। किंवा
सिनेमास जातांनाहि। खरंच नाहीं तुला

आजारी नाही हो. 'सौ' नी काल तुम्हाला पाहिलं नी ऑफिसला जाण्यापूर्वी दाढी न करण्याची ताकीद दिली.

आठवले । माझिया मीपणावरी पडो पाषाण । जळो हें भूषण नाम माझें । पापा नाही पार दुःखाचे डोंगर । झालो मी तुजसी ओझें । आप आपण्या घातकर । शत्रु झालों मी दावेदार । तूं तव कृपेचा सागर । उतरी पार शेजारी दादा ।

**ग्रामदेवता ( रस्यावरची झाडूवाली )**

हे ग्रामदेवते तुझ्या महान् कार्याची जाणीव कोणास नाहीं बरें ! सकाळच्यावेळीं रस्त्यांत धुळीचे लोट जमायला लागले, घाणीचे पर्वत रस्त्याच्या एका टोकावरून दुसऱ्या टोकावर जाऊन आदळले, तोंडांतून बाहेर पडलेल्या शेलक्या शिव्यांनीं वातावरणांत नवें चैतन्य खेळूं लागलें कीं समजावें, आली ग्रामदेवता– विधायक काम करणारी मंगल देवता ! शहराची आरोग्यदेवता ! सर्वत्र आनंदाचें साम्राज्य प्रस्थापित करूं इच्छिणारी नारीश्रेष्ठा !

पण आम्ही मंदभागी तुझ्याकडे पाहतो कुठं ? तू समोर दिसलीस तर थोबाडाभोंवतीं रुमालाचं जळमट घाण नाकातोंडांत जाऊं नये म्हणून धरतों आणि मग झाडूचा फटकारा बसला किंवा एकादं सडकं सालपट अंगाला कुठंस घसटून गेलं तर परत तोंड वर करून तक्रार करायला जातोच. तेव्हां मात्र तूं चंडिकावतार धारण करतेस. तुझ्या इवल्याशा तोंडांत एवढी मोठी वाक्गंगा साठवलेली असेल असें कल्पना करूनहि खरं वाटत नसतें. पण तीन फुटाच्या वामनाचं त्रैलोक्याला सामावणाऱ्या विष्णूंत जसं रूपांतर व्हावं तसाच चमत्कार होतो बघ. त्रैलोक्यालाहि ढळाढळा रडायला लावणारी तुझी वाणी एकदां कां सुरू झाली कीं साऱ्यांची त्रेधातिरपीट झाल्याशिवाय कशी राहील ? तेहतीस कोटी देवांचा उद्धार क्षणांत होतो. आमच्या चाळीस पिढ्या स्वर्गापासून नरका-पर्यंत हॉटेलांतल्या कढईत ढवळल्या जाणाऱ्या भज्यांप्रमाणें गदगदा फिरवल्या जातात. जगां-तले सारे तोफखाने तुझ्या प्रचंड वाणीपुढें किरकोळ शिटीप्रमाणें भासं लागतात.

हे महामये तुझ्या ह्या अक्राळविक्राळ अवताराला काय म्हणावं ? तुझ्याकडे कां आम्हांला पहावसं वाटत नाहीं, की बोलावेसें वाटत नाहीं ? पण त्यासाठीं तूं आपला वेष नि आचार बदल. धुळीनें माखलेल्या राकट केसांऐवजीं जरा चापचापून बसविलेल्यां केसांचा नाजूक शेपटा येऊं दे. गबाळपणें अंगावर घेतलेल्या पोतेऱ्याऐवजीं पांचवारी साडीचा पदर जरा फडकूं दे. त्या खराट्या-ऐवजीं हातांत रॅकेट किंवा मनीपर्स घेऊन बघ. मग पहा मीच काय, प्रत्येक जण तुझ्याकडे कसे टकमक पाहूं लागेल. बायकोची नजर चुकवून तुझ्यावर नेत्रकटाक्षांचा मारा करूं लागेल व मनांत गुणगुणेल.

सुंदर ते ध्यान उभें रस्त्यावरी ।
रॅकेट ती करीं घेऊनिया ॥
लॉकेट तें गळा उडे तो पदर ।
आवडे निरंतर तेंचि रूप ॥
इयरिंग छान तळपति श्रवणीं ।
ओष्ठीं तशी लालीहि शोभतं ॥
खरोखरी माझें हें चि सर्व सुख ।
पाहीन तव मुख आवडीनें ॥

अशा तऱ्हेनें विविध देवतांची प्रार्थना करण्याचा मार्ग त्रिविक्रमानें सुचविला आहे. भूलोकांत ह्यामुळें कीर्ति व सौख्य सहज मिळूं शकतात. त्रिविक्रमाच्या स्वतःच्या यशाचें तें एक रहस्य आहे. परंतु केवळ आत्मानंदावर संतुष्ट न राहतां जड जीवांना तारण्यासाठींच त्याचें हें प्रातःस्मरण लोकांसमोर मांडलें आहे. ह्या देव–देवतांच्या गुणगानाचा सर्व देशांत सुकाळ करून टाकावा हीच काय ती त्याची मनीषा आहे. हें कार्य करीत असतांना

' फोडीलें भांडार धन्याचा हा माल
मी तंव हमाल भारवाही । अशी नम्र वृत्तीच त्याची आहे, ह्यांत शंका नाहीं.










अनुक्रमणिका

### एक एकटी

...पान ९ वरून

फसवेगिरी–सगळ्या गप्पा सुरूं झाल्या. हजर नसलेल्या लेखकांची निंदा सुरूं झाली. मालविका समरसून ऐकत होती. आणि एकीकडे तवकीलेची बायको कशी असेल ह्याची कल्पना करीत होती. त्याची बायको अजून तिनें पाहिली नव्हती. ओळखीच्या कित्येक लेखकांच्या बायका तिनें पाहिल्याहि नव्हत्या. अन् ह्याबद्दल तिला रुखरुख नव्हती. ह्या लोकांना ती लेखक म्हणून भेटत होती. त्यांच्या बायका कांहीं लिहीत नव्हत्या. त्या स्त्रियांशीं तिला काय कर्तव्य होतं?' 'हे लिहिण्यांत गर्क आहेत...ह्यांचं पुस्तक प्रसिद्ध झालंय...साहित्यिक सारखे घरी येतात, चहाचं आधण सारखं चढलेलं असतं...'माफक स्तुति, माफक गर्व. तिला त्या गृहिणींची गंमत वाटली. अन् सगळ्या लेखकांचा हेवा वाटला. पुरुष साहित्यचर्चेतून आपल्या स्त्रियांना वेगळं ठेवूं शकतात, त्यांना विसरून अनुभव घेतात, मनसोक्त लिहितात, सभासंमेलनं गाजवतात. लेखिकेला मात्र नवरा जवळ नसला तरी त्याची सावली टाळता येत नाहीं. कलावंताचं विमुक्त जिणं जगतां येत नाहीं.

'हें आपलं कॉमन मॅन म्हणून माझं ऑब्झर्वेशन आहे. मी कांहीं लेखक नाहीं. आपल्याला तुमचं ते उच्च पातळीवरचं कलात्मक संगीतच...' तिचा नवरा हावभाव करून म्हणाला व ती भोवंडून गेली. वाटलं, हा आतां गप्प राहील तर बरं! आपला पति म्हणून सगळं ह्याचं वरकरणी ऐकून घेत आहेत. पण आंतून हे कंटाळले असतील. बाहेर गेल्यावर त्याची टिंगल करतील.

दिवेलागणी झाली तशी सगळे जायला निघाले. ती एकटीच दारापर्यंत पोचवायला गेली. सुरेश आपल्या 'बाई'चा दंड पकडून चालूं लागला. सुरेखा मात्र झुकांड्या खाल्ल्यासारखी जात होती. महाशब्दे रस्त्यांत मोठ्यानें बडबडूं लागला. तवकीलेनी निरोपाचा नमस्कारहि केला नाहीं हें तिला बोचलं. वेश्या जीवनावरची एक दीर्घकाथ त्यानें नुकतीच हातावेगळी केली होती. तीं वाचायला मागायचं तिच्या फार मनांत होतं पण तिला धीर झाला नाहीं. स्त्रीत्वाच्या, नवऱ्याच्या बंधनामुळें आपल्याला तवकीलेसारखे अनुभव घेतां यायचे नाहींत ह्या उणीवेनें ती जराशी अस्वस्थ झाली व घरांत परतली.

व्हरांड्यांतल्या कपबशा सोनूबाईनें आवरून नेल्या होत्या. नवरा पाईप पेटवण्याच्या खटपटीत होता. लेखकांच्या गप्पा ऐकून तो कंटाळला असावा. त्याचं आज क्लबांत जाणंहि हुकलं होतं. बायको लेखिका असल्यानें एक विचित्र भूमिका त्याच्या वाट्याला आली होती. नटीच्या नवऱ्यापेक्षांहि विचित्र! तुमचं तें उच्च साहित्य आपल्याला कळत नाहीं...धरण्यास चोचीत चंद्र–व्यभिचारी...तूं लिहीत होतीस म्हणून बाहेर बसून चहा घेतला...तूं जा काव्यगायनाला, मी मुलांना सांभाळीन...एक कविता लिहिलीस तों इतकी आजाऱ्यासारखी दिसूं लागलीस!...तुला नेमकं काय हवंय, मालविका!...मालविकेला त्याची कणव आली. बायकोचा आडमुठेपणा व एकाकीपणा ह्याच्या पेंचांत तो अडकला होता. बिचारा कसाहि वागला तरी वेंधळा ठरत होता. अखेर त्यानें चारचौघां नवऱ्यांसारखंच वागायला हवं. बायकोवर अधिकार गाजवायला हवा. क्लबांत चार पुरुषांत रमायला हवं. उशीर करून घरीं येऊन उन उन अन्न खायला हवं...

### 'अंजन कांचन करवंदीच्या कांटेरी देशा—'

'गांव करी, ते राव न करी' खेड्यांतील, मोहल्ल्यांतील मुलें मुलीं, स्त्री–पुरुष, आबाल–वृद्ध निरनिराळ्या झाडांची रोपें गोळा करून



झाडें लावण्याला एकत्रित झाले तर खेड्यांत हजारों झाडें लावण्याचें काम एका दिवसांतहि संपूं शकतें. गाज्यावाज्यानें, भजनमंडळ्या व मिरवणुकी काढून हा कार्यक्रम पार पाडता येईल. सामूहिक जनशक्ति ही हिमालयाएवढी महान आहे. ती जागी झाल्यास मग काय उणें! या वृक्षारोपण मोहिमेच्या काळांत अनेक राष्ट्रीय सण येतात. या सणाच्या दिवशीं वृक्षारोपण समारंभ मोठ्या उत्साहानें साजरा करता येईल.

निसर्गाच्या अर्थव्यवस्थेंत झाडांचें स्थान फार मोठें आहे. ती पर्वतांचा दिमाख कायम ठेवतात. पाऊस व वादळाचा जोर मोडून टाकतात. झाडें नद्यांना शिस्त लावतात, पुराचें नियंत्रण करतात, पक्षांची जोपासना करतात, हवा स्वच्छ व थंड ठेवतात. बारामाही वाहणाऱ्या जलप्रवाहाची राखण करतात, धुळीच्या लोटापासून जमिनीचें संरक्षण करतात, वारा व पाणी यामुळें होणारी जमिनीची धूप थांबवितात व जमिनीचा सुपीकपणा टिकवितात. सांस्कृतिकदृष्ट्याहि वृक्षांना केवढें महत्त्व आहे. जेथें आपले थोर ऋषि आत्मबलानें राहिले त्या अनेक तपोवनांतून आपल्या संस्कृतीस सामर्थ्य लाभलें. आपल्या पूर्वजांच्या स्मृति, नंदनवनाचें सौंदर्य, दंडकारण्यांतील नाट्यपूर्ण प्रसंग, महासाध्वी सीतेचा अशोकवनांतील शोक यांच्याशीं निगडित आहेत. त्याचबरोबर आपल्या जीवनाचा आनंद श्रीकृष्णाच्या वृंदावनाशीं निगडित आहे. त्याच्या बासरीनें वृंदावनाला वेड लावलें.

वृक्षपूजेचे आपणांस विस्मरण झालें आहे. शकुंतला झाडाला पाणी घातल्याशिवाय कांहींही खात नसे. केश विभूषित करण्यासाठीं तिनें कधींहि कोवळ्या फांद्या तोडल्या नाहींत. त्या तोडल्यानें रोपाला दुःख होतें अशी तिची भावना होती. वृक्षलता फुलांनीं बहरल्या कीं तिला एखाद्या सणासारखा आनंद होई. पार्वतीनें तर एका देवदार वृक्षाला आपण पुत्र समजून त्याचें संगोपन केलें होतें. आपल्यालाही ही सौंदर्यदृष्टी आली पाहिजे. आपल्या पूर्वजांना जसें जंगलांतील वनश्रीचे वेड होतें तसें आपल्यांत राहिलेलें नाहीं तेव्हां आपणाला आपल्या संस्कृतीशीं प्रामाणिक राहिलें पाहिजे. आपली संस्कृती अरण्याची आहे. ती प्रचंड वृक्षांच्या पर्णराजीवर पडलेल्या दंवबिंदूवर पोसली आहे.

**मा. सां. कन्नमवार**
मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य









तुमचा फुकट वेळ गेला. क्लबांत जा तुम्ही, तसा उशीर नाहीं झाला—'

'तूंच कंटाळलेली दिसतेयस. फिरायलाच चलतेस?'

'नको. तुम्हीच जाऊन या क्लबमध्यें. जरा बिलियर्ड खेळलात कीं छान वाटेल तुम्हांला—' तिच्या डोळ्यापुढें प्रचंड दिव्यांनी उजळलेली बिलियर्ड टेबलाची हिरवी मखमल दिसली. तोंडांत पाईप व हातांत क्यू घेऊन नवरा जवळ उभा होता. सगळे पुरुष. बिलियर्डस्, रमी, टेनिस. सिगरेटीचा धूर, बियरचा फेस. नेकटाय, पँटस्, कोरलेल्या मिशा. उग्र वास!' 'तुम्ही क्लबांतून येईपर्यंत मी तुमच्या आवडीचा पुलाव करते–' ती मृदुपणें म्हणाली. दमलेल्या नवऱ्याला आवडीचे पदार्थ आग्रहानें वाढायला आतुर झाली.

'जाऊं दे आतां. मला भूकहि नाहीं फार. जेवून मग फिरायला जाऊं हवं तर. स्वैपाक होईपर्यंत मी दोनतीन पत्रं राहिलीं आहेत तीं खरडतो...'

त्यानें व्हरांड्यांतला टेबल लँप लावला व तेथेंच खुर्ची ओढून व पॅड उघडून तो पत्रलेखन करूं लागला. त्याच्या हातातलं उघडं पेन व मामुली पत्रं लिहितांना झालेली त्याची एकाग्रता ती क्षणभर पहात राहिली. मग ती पुलाव करायचा म्हणून उत्साहानें स्वैपाकघरांत गेली. रेणुबाईनें बहुतेक स्वैपाक उरकून टाकला होता. भात शिजला होता रस्सा तयार होत होता. तिचा विरस झाला. ती सावकाशीनें सॅलड बनवूं लागली.

जेवतांना तो उत्साहानें कारखान्यांतल्या हकीगती सांगूं लागला. संप टळत नव्हता. नवा लेख येऊन पडला होता. पर्सनल मॅनेजरनें पैसे खाल्ले होते म्हणे. मालकाच्या बायकोनें डॉलर परमिट मिळविला होता व ती अमेरिकेंत जाणार होती. एका मशिनच्या नव्या डिझाईन-बद्दल त्याचा मुकर्जीशी बराच वाद झाला होता. केवढं वेगळं, भरगच आयुष्य. तो धडपडत होता. यशापयशांत घोळत होता. एका मोठ्या कारखान्यांत खूप काम करीत होता व आपल्या उबदार संसारांत रमला होता. स्वतःचं घर, मोटर, दोन गोजिरी मुलं, सुंदर प्रेमळ पत्नी... तिला तरी काय कमी होतं? मुकर्जींची बायको सोशलवर्क करते, शेजारीण सतार वाजवते—तिलाच लेखक होण्याचं काय अडलं होतं? काळीज पिळवटून काढायचं, दुसऱ्यांच्या व्यथांशीं एकजीव व्हायचं, एकाकी वाटचाल आक्रमित रहायचं!

तिनें ठरवलं, सोडून द्यायचं लेखनबिखन! कलानिर्मितींतला आनंद असेल, पुत्रजन्मापेक्षां जास्त सुख मिळतें असेल, पण हा शीण, ही जीवघेणी अवस्था नको. चारचौघींसारखं लोळावं, नटावं, महिला समाजांत जावं...तिला एकदम सुटल्यासारखं वाटलं. ती नवऱ्यासारखं चवीनें जेवूं लागली व त्याच्या गप्पांत रस घेऊं लागली.

'भटकून यायचं?...' सुपारी खातांना तो म्हणाला. झिमरू खांद्यावर लपेटून ती तयार झाली. त्याच्याबरोबर मालकिणीसारखी मोटरींत बसली.

पेट्रोल पंपापाशीं मोटर थांबवून तो खालीं उतरला. ती बसल्या जागेवरून सभोंवताली पाहूं लागली. हवा सुंदर पडली होती. आकाश निळंभोर होतं व कोपऱ्यांत एकच चांदणी लुकलुकत होती. घराघरांत दिवे लागले होते व समोरच्या सरळ रस्त्यावर दिव्यांची ओळ टिपकत होती. हे दाटीवाटींतले असंख्य दिवे व भव्य आकाशांतील एकच चांदणी! तिचं हृदय झुललं व जिव्हणी विलग झाली. काव्य! कवितेच्या ओळी स्फुरण्याची अवस्था. ती हंसली व झिमरू सावरूं लागली. बाजूला दोन तरुण तिच्याकडे पहात होते. आदरानें, कौतुकानें. 'हीच ती लेखिका–मालविका मुजुमदार!' ती जरा लाजली–जरा भारून गेली. आपल्या साहित्याचा तिला अभिमान वाटला. एवढाच एक तिचा अमोल ठेवा होता. तिनें निर्मिलेला. एका पारड्यांत नवरा नि मुलं नि दुसऱ्या पारड्यांत तिचं लेखन. पेट्रोल घेऊन गाडी भरधांव निघाली. नवरा न बोलतां पाईप तोंडांत धरून गाडी चालवीत होता. गार वारा अंगावर घेत ती दाराशीं रेलली होती. दुपारची कथा तिच्यापुढें येत होती. नायिकेचं विवाहपूर्व प्रेम, कथेची सुरवात, संवाद. एकदम ती स्वतःच्या कवितेच्या ओळी पुटपुटूं लागली. तिच्या पुस्तकांच्या प्रति दुकानादुकानांतून मांडलेल्या तिला दिसल्या. दीर्घ काव्यानें खूष होऊन एका वाचकाचं पत्र तिला आलं. डायरींत नोंद करून ठेवलेल्या कादंबरीच्या, कथांच्या कल्पना पिंगा घालूं लागल्या. एकएक पात्र, एक एक उपमा, एक एक शब्द...एका अद्भुत गहिऱ्या विश्वांत ती विरघळून गेली.

कोसळत्या पावसांत चिंब भिजून यावं तशी ती घरीं परतली. स्वतःच्या संसारांत. संसार, मोटर, बंगला, व्हरांड्यांतील मुलांचे फोटो, लेखनाचं टेबल, झोपायची खोली. हेंच तिचं जग होतं. इथेंच तिला तडजोड करीत राहायचं होतं. मगाशी डोळ्यापुढें भिरभिरणारी व काळीज पोखरणारीं माणसं, त्यांचीं बिऱ्हाडं, त्यांच्या समस्या–सारं परकं होतं.

तिला परत अस्वस्थ झालं. असाह्य, एकाकी वाटलं. एकदां लेखनाच्या बैठकीकडे व एकदां डबल बेडकडे ती आळीपाळीनें पहात उभी राहिली. नवरा गाडी ठेवून दार बंद करून कधीं आला तें तिला कळालेंहि नाहीं. तिला विळखा घालीत तो म्हणाला, 'ये मालविका उभी कां अशी?...झोप आतां...'

त्याच्या स्पर्शानें ती चरकली. अखेर ती स्त्री होती, पत्नी होती! मघाशी निर्मितीच्या धुंदींत तिला शरीरसुखाची ओढ वाटली; आतां पत्नी म्हणून तिला वासनेंत विरघळायला हवं होतं. मालविकाला विचित्र झालं. नवऱ्याचा स्पर्श नकोसा झाला. त्याच्यापासून दूर होत ती म्हणाली, 'तुम्हीं पडा. मी चार पानं लिहायची राहिली आहेत ती संपवून टाकते आधीं—'

तशीच ती टेबलाशीं गेली. न संपविलेल्या कथेच्या कागदावर तिनें कोपरं टेकली व हातांच्या ओंजळींत तोंड झाकून ती बसून राहिली. कथा पुरी करण्याची तिला आतुरता नव्हती. नवरा घोरत होता. श्रीधरची आठवणहि येत नव्हती. सगळं कसं परकं झालं होतं व फार एकाकी वाटत होतं. आपण लेखक आहोंत, त्यांतहि स्त्री आहोंत हें तिला विसरतां येत नव्हतं. आणि सगळं सुखाचं, सुरळीत असूनहि हा आयुष्य पोखरणारा एकलेपणा आपल्याला भोगत राहायचा आहे ह्या जाणीवेनं ती शून्यपणें बसून राहिली होती.

●●●






## अखेर काळानें मात केली

पान १२ वरून

### जंगबहादूरचें बेगम हजरतला पत्र

नानासाहेब व बेगम हजरतची भेट झाल्यावर नानासाहेबांनां बेगम हजरत महल व तिचा नऊ वर्षाचा मुलगा बिरजीस कादर हेंहि येऊन मिळाले. त्यानंतर हे सर्व सोनगांव येथें येऊन राहिले. परंतु सोनगांवांत आपला तळ ठोकण्याच्या तयारींत असतानांच त्यांना नेपाळचा राणा जंगबहादूरचें चितवन् येथें ताबडतोब निघून जाण्यासंबंधीचें पत्र आलें. हें पत्र बेगमसाहेबांच्या नांवें आलें होतें. तसं पाहिलं तर नेपाळचा राणा वरवर जरी इंग्रजांच्या सांगण्याप्रमाणें ऐकत असला. तरी नानासाहेबांच्याप्रति सहृदयता, सद्भावना होती. नानासाहेबांनीं आरंभिलेल्या या क्रांतिसमरांस उघडपणें जरी नसला तरी मनांतून पाठिंबा होता. किमान् नानासाहेबास तथा त्यांच्या अन्य साथीदारांस तो अप्रत्यक्षपणें सहाय्य करीत होता. हें सारे करीत असतांना त्याची परिस्थिति मोठी चमत्कारिक होत असे. कारण उघडउघड इंग्रजांशीं वैर पत्करून नानांनीं आरंभिलेल्या कार्यांत भाग घेण्यासहि त्याची तयारी नव्हती. तेव्हां इंग्रजांना आधिक न दुखवितां, नाराज न करतां अप्रकटपणें या मुक्तिसैनिकांना जेवढी मदत करतां येणें शक्य होतें तेवढी तो अप्रत्यक्षरीत्या करीत असे व इकडे इंग्रजांशीं स्नेहाचे संबंध राखले होते. अशा तऱ्हेची तारेवरची कसरत त्यांस करावी लागत होती.

### जंगबहादूर व नाना भेटले

एवढंच कशाला नेपाळचा राणा जंगबहादूरचा नानांशीं निव्वळ घनिष्ट स्नेहसंबंधच नव्हता तर राणा व नाना यांच्यांत पत्रव्यवहारहि होत होता. एकदां तर नानांनीं कामानिमित्तानें आपला धाकटा भाऊ बाळाराव यांस राणाच्या भेटीसाठींहि पाठविलें होतें आणि एकदां तर साऱ्या क्रांतिसहयोग्यांचा मेळावा चितवन येथें होऊन गेल्यानंतर नानांनीं राणा जंग बहादूरची प्रत्यक्ष भेट घेतली होती. ही भेट निश्चितपणें झाल्याचा पुरावाहि उपलब्ध आहे. परंतु या प्रत्यक्ष भेटींत निश्चितपणें काय वाटाघाटी झाल्या हें कुणालाच ठाऊक नव्हतें. परंतु या भेटीनंतर नानांच्याविषयीं राणा जंगबहादूरच्या हृदयांत जी एक आपुलकीची, आदराची, स्नेहाची भावना होती ती अधिकच दृढ झाली, वाढत गेली व यामुळेंच जेव्हां जेव्हां इंग्रज सरकार राणा जंगबहादूरकडे नानासाहेबांविषयीं विचारणा करी त्यावेळीं राणा जंगबहादूर नानासाहेबांच्या संबंधांत आपणांस कांहींच माहीत नसल्याचें सांगत असे. एवढेंच नव्हे तर बेगम हजरत महलला पुनःश्च इंग्रजांविरुद्ध उठाव करण्याविषयीं सल्ला त्यानें दिला होता. एकदां तर खुद्द नानांना जंगबहादूरनें कांहीं शर्तींवर इंग्रजांच्या स्वाधीन होण्याचा सल्ला देऊन स्वतः त्या शर्तींचा खर्डाही तयार केला होता. परंतु राणा जंगबहादूरचा हा सल्ला स्वाभिमानी नाना पेशव्याना, त्यांच्या स्वतंत्र, देशाभिमानी वृत्तीला रुचणारा नव्हता. राणाचा हा सल्ला पसंत न पडून 'प्राण गेला तरी इंग्रजांच्या स्वाधीन होणार नाहीं व अखेरपर्यंत इंग्रजांशीं निकराचा लढा देण्याचा' त्यांनीं आपला बाणेदार निर्धार व्यक्त केला.

### नानाला जंगबहादूरचा आदेश

पण इंग्रजांना नानासाहेब नेपाळांतच कुठें तरी दडी मारून बसले असल्याचा दाट संशय होता व तशी त्यांना कुणकुणही लागली होती. म्हणूनच इंग्रजांचा नेपाळच्या राणावर सतत दडपण आणण्याचा प्रयत्न चालू होता. आणि इंग्रजांच्या दडपणामुळें दिवसेंदिवस नानांचें नेपाळांत रहाणें धोक्याचें आणि असुरक्षित होत चालल्याचें पाहून नेपाळच्या राणा जंगबहादूरनें नानांशीं पत्रव्यवहार करून शेवटीं असें कळविलें कीं यापुढें आपणांस कसल्याहि प्रकारचें सहाय्य व संरक्षण न देण्याचें अगदीं नाइलाजानें भाग पडेल. तरी लवकरांत लवकर आपण आपल्या सर्व साथीदारांनिशीं नेपाळ सोडावें व नेपाळच्या हद्दीबाहेर पडण्यास सर्वतोपरी सहाय्य देण्याचें कळविलें.

### भारताबाहेर क्रांतीचा डोंब उसळला

१८५७ च्या क्रांतीच्या अपयशानंतर विद्रोहाचे नेते इतस्ततः विखुरले गेले होते. सर्व ठिकाणीं पसरले होते. हें जरी खरें आहे तरी पण त्यांनीं नानांशीं या ना त्या नात्यानें संबंध ठेवला होता. आणि ज्यांना भारतांत असुरक्षित, धोक्याचें होतें ते सारे नानांना येऊन मिळालें होतें. तर कांहीं विद्रोही नेते तुर्कस्थान, अरबस्थान, काहिरा, रशिया या ठिकाणीं जाऊन पोहोंचलें होतें. नाना हे मोठे व चतुर दूरदर्शी व अद्वितीय असे सेनानी होते. त्यांना असें वाटत होतें कीं केवळ एकाच देशांत स्वातंत्र्याची चळवळ व लढा यशस्वी होणें अशक्य होतें, तर अशा तऱ्हेचा प्रयत्न नुसत्या भारतांतच न होता, केवळ भारतापुरताच मर्यादित न राहतां सर्व आशिया खंडांत स्वातंत्र्याची भावना चेतविली गेली पाहिजे. सारा आशिया खंड पारतंत्र्याचें जोखड झुगारून देऊन खडबडून उठला पाहिजे. साऱ्या आशियावर या क्रांतीचें लोण पसरलें पाहिजे. ही क्रांति, लढा इंग्रजांविरुद्धच असेल असें नाहीं. तर आशिया खंडांतील शासकाविरुद्ध असेल. मग तो शासक, राजकर्ता इंग्रज गोरा असो वा अन्य कुणीहि असो. आणि या एकाच अदम्य, स्वयंभू, स्वयंप्रेरणेनेंच नानांनीं मुस्लिम देशांतून जुलमी इंग्रज राज्यसत्तेविरुद्ध व अत्याचारी चिनी राजवटीविरुद्ध विद्रोहाची भावना चेतवली. आग भडकविली. क्रांतीचा डोंब उसळविला.

नानांच्या एका साथीदारानें–खुदाबक्षनें–इंग्रजांविरुद्ध लढण्याची जय्यत सिद्धता करून फौजफाटाहि एकत्र करण्यास सुरवात केली. ही घटना झाली १८५९ मधली. तसेंच नानांनीं आपल्या सर्व साथीदारांस असें क्रांतिमोत्तर कळविलें कीं, आम्ही कुठल्याहि देशांत इंग्रजांना शरण येणार नाहीं व त्यांच्या स्वाधीन होणार नाहीं व मोका मिळतांच आम्हीं इंग्रजांवर तुटून पडू व त्यांच्या नरडीचा घोट घेऊं व मारू किंवा मरू. या निर्वाणीच्या भावनेनें अखेरचा निकराचा लढा देण्याची सिद्धता आरंभिली.

### शिबिरांत रोगराई व मृत्यूची वार्ता

इंग्रजांशीं प्राणपणानें सामना करण्याची, देण्याची सारी सिद्धता करण्याचा एकमुखी निर्धार झाला. निश्चयात्मक निर्णय घेण्यांत आला. परंतु दैवच फिरलें. योजना कार्यान्वित होण्यापूर्वीच योजनेचे एक एक आधारस्तंभ कोसळूं लागले. नानांच्या क्रांतिशिबिरांत रोगराईनें शिरकाव केला. या रोगराईनें कट केल्याप्रमाणें म्होरक्यानाच निवडून काढलें आणि एकेकाची निवड करावी त्याप्रमाणें प्रमुख क्रांतिवीरांनांच गांठलें. सर्वप्रथम गोंडचे महाराज देवीबक्ष यांचा १३ जुलै रोजीं पहिला क्रमांक लागला. तदनंतर नानांचे धाकटे बंधु बाळाराव २९ जुलै रोजीं महामारीनें मरण पावले. नानांचा उजवा हात खुदाबक्ष यालाहि लागण होऊन तोहि आजारी पडला व मरणाच्या पंथास टेकला. तदनंतर बुंदीचे महाराज सवाई हरदत्त व मुम्मूखाँ यांस महा-






मारीनें ग्रासलें. इकडे अजिमुल्लाहि महामारीनें मरण पावल्याची बातमी येऊन थडकली. नानांचें अर्धेंअधिक अवसान् खचलें. एवढंच नव्हें तर अजिमुल्लाच्या मृत्यूनंतर खुद्द नानासाहेबहि महामारीनें मरण पावल्याची बातमी सर्वत्र पसरली आणि नेपाळच्या जंगबहादूरनें त्याप्रमाणें इंग्रज सरकारांस खबर दिली. १८५९ मध्यें नानासाहेब पेशवे मरण पावल्याचें सर्वजण मानूं लागलें.

नानासाहेब मरण न पावल्याचा आणखी पुरावा पुढें करण्यांत आला. नानांना इंग्रजांच्या बरोबर झालेल्या युद्धांत हार खावी लागली. त्या ठिकाणीं एकेदिवशीं तेथल्या गांवकऱ्यांना एक चिता जळत असल्याचें दिसून आलें आणि याच आधारावर नानासाहेबांच्या मृत्यूची बातमी पसरविण्यांत आली. आणि ही गोष्ट त्या गांवांतील नानकचंद नांवाच्या एका इसमानें देवकपुरांत २ सप्टेंबर १८५९ रोजीं दुपारीं दोन वाजतां नानांचा मृत्यु झाल्याचें सांगितलें. तसेंच आणखी एका व्यक्तीनें २४ सप्टेंबर १८५९ रोजीं नानांचा मृत्यु झाल्याची बातमी दिली. परंतु एक मात्र खरं कीं नानांचा मृत देह कुणींच पाहिलेला नाहीं.

**या सर्वच गोष्टी परस्पर अगदीं भिन्न होत्या**

या कांहीं गोष्टींवरून नानासाहेबांचा त्यावेळीं मृत्यु झाला नसावा अशा तऱ्हेची शंका डोकावते. खुद्द नेपाळचा रेसिडेन्ट कर्नल रेमेजहि त्यावेळीं नानासाहेबांच्या मृत्यूविषयीं साशंक होता. त्यालाहि नानासाहेबांच्या मृत्युसंबंधांत खरेपणा वाटत नव्हता.

कर्नल रेमेज हा मोठा धूर्त होता व तो नेपाळचा राजा जंगबहादुरास चांगलाच ओळखत होता. एव्हढंच नव्हे तर वरवर इंग्रजांशीं स्नेहसंबंध, इमानदारी दाखवून तो आंतून नानासाहेबांस मिलाफ होता व नानांच्या साथीदारास मदत करीत असल्याचें त्याला माहीत होते व नानासाहेब वेशांतर करून इंग्रजांच्या जाळ्यांतून निसटून पळून जाण्यांस अवसर मिळावा म्हणून जंगबहादूरनें मुद्दामच नानासाहेबांच्या मृत्यूची बातमी पद्धतशीरपणें पसरविली असावी अशा तऱ्हेचा कर्नल रेमेजचा अंदाज, तर्क होता. आणि म्हणूनच नानांच्या मृत्यूसंबंधांत विश्वास ठेवण्यांस तो तयार नव्हता.

आपला हा दृढ संशय त्यानें १८६१ साली सेक्रेटरी सिसिलला पत्र पाठवून कळविला; त्यांत तो म्हणतो, 'नानासाहेब मरण पावले नसून अजून जिवंत आहेत व त्यासंबंधींचा भरपूर पुरावा मजकडे आहे. नानासाहेबांच्या मृत्यूची बातमी पद्धशीरपणें पसरविण्यामागें एकच हेतू होता तो म्हणजे नेपाळच्या पहाडांत नानासाहेबांस लपून रहातां यावें अन्यथा सोईस्करपणें पळून जाण्यास त्यांना संधी मिळावी.' आणि जेव्हां नानासाहेब जिवंत असून खोतानमध्यें महंमदअल्ली नांव धारण करून त्या ठिकाणीं प्रचंड सैन्य-संचालनाचें कार्य करीत असल्याची बातमी इंग्रज गणितज्ञ मि. जॉनसन् यानें देतांच यापूर्वी कर्नल रेजिमनें व्यक्त केलेला संशय खरा असल्याचें पटलें व कर्नल रेजिमच्या त्या पत्राची त्यानंतर आठवण झाली. परंतु खरं म्हणजे १८५८ ते १८६१ पर्यंत म्हणजे इंग्रज गणितज्ञ मि. जॉनसन यानें प्रस्तूत खळबळजनक बातमी आणून देईपर्यंत कुणालाच नानासाहेब जिवंत असल्यासंबंधीच्या वार्तेत तथ्य वाटत नव्हतें.

**अज्ञातवासांतला बाका प्रसंग**

नानासाहेब १८५९ ते ६१ अज्ञातवासांत लपत छपत कुठें कुठें आणि कसें कसें भटकत होते. राणा जंगबहादूरनें त्यांच्या मृत्यूची बातमी मोठ्या कौशल्यानें पसरविली होती त्यामुळें त्यांच्यामागचा इंग्रजांचा ससेमिरा थोडाफार कमी झाला होता. अशा परिस्थितींत वेश पालटून ते कधीं सोनगांव तर कधीं चितवन तर कधीं देवपूरच्या पहाडांतील बुंदीचे महाराज हरदत्त यांच्यासमवेत नऊ हजार सैन्याच्या कड्यांत नसेराबाद येथें तर कधीं धोकुल थापांत. अशा तऱ्हेनें लपून छपून दिवस कंठीत होते. डुंगरगांव येथें असतांना मोठा बाका प्रसंग उद्‌भवला होता. फकिराच्या वेशांत तीन-चारशें सैनिकांनिशीं ते डुंगरगांवामध्यें प्रविष्ट झाले. एवढे फकीर एकाएकीं कुठून आले असा तेथील गांवकऱ्यांना प्रश्न पडला. गांवकऱ्यांना वाटलें मामला कांहीं तरी वेगळाच असावा. चतुर नानांनीं तो प्रसंग ओळखून थोड्या थोड्या लोकांनिशीं तेथून त्या साऱ्यांनीं पाय काढला. अन्यथा हें गौडबंगाल उघडकीस येऊन नानांना एका मोठ्या प्रसंगास तोंड द्यावें लागलें असतें. तेथून त्यांनीं पोबारा केला ब ते तडक तिबेटांत मुक्तिनाथ येथें जाऊन पोहोंचलें ब पुढें ते नेपाळांत जंगबहादूरकडे गेले. तेथें त्यांनीं आपल्याबरोबर आणलेली सारी चीजवस्तू, मौल्यवान दागदागिने व पैसा• जंगबहादूरच्या स्वाधीन केला. त्याची पक्की पावती घेतली व तेथून ते खोतान् येथें आले. साधारणतः १५ वा १६ डिसेंबर १८६१ रोजीं नानांनीं नेपाळ सोडला असावा, असा अंदाज आहे.

**नानांचा भारताशीं पत्रव्यवहार**

भारतापासून दूरवर असलेल्या खोतान् येथें आल्यानंतर सुद्धां नानांचे भारताशीं संबंध तुटलेले नव्हते. नानांचे संबंध जोडलेले होते व पत्रव्यवहारहि होत होता. दिल्लीचा शहाजादा फिरोजशहा बरोबर नानांचा पत्रव्यवहार चालू होताच. गनिखाँ नांवाच्या हिंग व सुकामेवा विकणाऱ्या व्यापाऱ्याशीं संधान बांधून नानांनीं शहाजादे फिरोजशहाशीं पत्रव्यवहारानें संपर्क राखला होता. थोड्याशा चुकीनें तो पकडला गेला. परंतु त्यानें नानांचें पत्र इंग्रजांच्या हातीं लागूं दिलें नाहीं. तसेंच बिठुरीदेखील नानांनीं संपर्क राखला होता. शिकारपूरहून खोतानकडे येणाऱ्या एका हिंदु व्यापाऱ्याबरोबर नानांनीं संधान बांधलें होतें. तो नानांचा चांगला मित्र

होता. तो देशोदेशीं हिंडून व्यापार करी व त्याचबरोबर भारतांतील बातम्याहि नानांस पुरवीत असे एवढेंच नव्हे तर चतुर नानांनीं आपल्या मैत्रीचें जाळें काश्मिरच्या शासकांपर्यंतहि पोहोंचविलें होतें. दिल्लीचा शहाजादा फिरोजशहा तर एकदां नानांच्या भेटीसाठीं खोतान येथें आला होता व नानांच्या सल्ला मशाविरान्ति तो फारसमध्यें कुठें तरी दडी मारून बसला व तेथून तो इंग्रज शासनाविरुद्ध प्रभावी संघटना उभारण्याच्या कार्यास लागला.

या साऱ्यांच्या प्रयत्नामागें एकच उद्दिष्ट होतें. एकच आशय होता. भारताच्या स्वातंत्र्यासाठीं पुनःश्च निकराचा आणि अखेरचा प्राणपणानें यत्न करावयाचा. परंतु या वेळीं त्यांच्या उद्दिष्टाची मर्यादा केवळ भारतापुरतीच मर्यादित नव्हती. तर समस्त आशिया खंडात एकदम उठाव करून परकीय सत्ता उखडून टाकावयाची असा त्यांचा मनोमन बेत होता.

### नानांनीं सेनाधिपत्य स्वीकारलें

नानांनीं नंतर खोतानचा बादशहा हबीबुल्ला याच्याशीं संधान बांधून त्याच्याशीं चांगलेंच सूत जमविलें व आपल्या मताचा त्याच्यावर चांगलाच प्रभाव पाडला. स्वातंत्र्य–संग्रामात भाग घेण्याप्रत त्याची तयारी केली. त्यांस उद्युक्त केला–त्यानें आपले सारे विश्वासू सैनिक जमवून, संघटित करून, तीनशें शिपायांची एक एक तुकडी करून या साऱ्यांची अलग अलग व्यवस्था करून अगदीं जय्यंत तयारी केली.इकडे शहाजादा फिरोजशहानें बखारिन येथें जाऊन सेना एकत्र केली होती. फिरोजशहानें आपल्या सेनेनिशीं पश्चिमेकडून स्वारी करावयाची व उत्तरेकडून नानासाहेब उर्फ महंमदअल्ली खोतानच्या विशाल सैन्यानिशीं चाल करून जावयाचें असें अगदीं नक्की ठरलें. परंतु याहि खेपेस त्याचें दुर्भाग्य आडवें आलें. दुर्भाग्याची गोष्ट अशी कीं ही त्यांची योजनाच अंमलांत येऊं शकली नाहीं. या योजनेची अंमलबजावणी होऊं शकली नाहीं. तिकडे फिरोजशहावर कांहीं आपत्ती येऊन तो अडकून पडला व त्याची साथ आयत्यावेळीं मिळूं न शकल्यानें खोतानहून नानांना आगे बढण्याचा अवसरच मिळाला नाहीं. शेवटीं निराश होऊन नानासाहेब उर्फ मोहंमद अल्लीनें बादशहा हबीबुल्लाकडे स्वतःस मुक्त करण्याची परवानगी मागितली परंतु बादशहानें नानांची ती परवानगी नाकारली. कारण बादशहा हबीबुल्लाच्या अफाट सेनेचें संचलन, सेनाधिपत्य सांभाळण्यास नानासाहेबासारखी दुसरी कर्तृत्ववान लायक व्यक्ति नव्हती.

अखेर निराश झालेल्या नानासाहेबांना १८६९ मध्यें संधी मिळाली. वकील बनून ते लगेच लडाखला आले. परंतु त्यांचा खरा उद्देश होता रायफली, रिव्हॉल्व्हर आदि युद्धोपयोगी शस्त्रें खरिदण्याचा आणि हा उद्देश सफल झाल्यानंतर नानासाहेब कांगडा, पंजाब येथें आले.

### पुनश्च उठाव

इकडे नबाब सुलतान इब्राहिम आपल्या कामगिरीनुसार साधनसामग्री जमविण्यांत गुंतला होता. चतुराईनें जमवीत होता व एव्हांना नानासाहेब मक्केला जाऊन पोहोंचले होते. त्यांच्याबरोबर शहाजादा फिरोजशहा व अजिमुल्लाहि होते. मक्का हें यात्रेचें ठिकाण आहे. त्या ठिकाणीं हजारों यात्रेकरू येत असतात व यात्रेकरूंच्या मार्फत आपल्या देशाशीं संपर्क राखणें अधिक सुलभ व फायदेशीर होईल या दृष्टीनें नानांनीं हें ठिकाण आपल्या मुक्कामासाठीं निवडलें. या खेपेस मुस्लीम देशातून क्रांतिसंघटन करून सर्वशक्ति केंद्रित करण्याचा मनसुबा होता.

### अमेरिकन कंपनीकडून २ कोटी पौंड शस्त्रसामुग्री

या खेपेची त्यांची योजना फारच प्रचंड अशी होती. त्याची क्रांति भारत देशापुरतीच नव्हती तर या योजनेचे हातपाय भारताबाहेरहि पसरले होते. मक्का, मदिना या ठिकाणीं बसून भारताशीं संपर्क राखून आपल्या उद्दिष्टाप्रत भारतांत देशप्रेमाची, स्वातंत्र्याची भावना प्रज्वलित करावयाची व उद्दिष्ट साधण्यासाठीं भारताबाहेरील देशांतून मदत गोळा करावयाची व योग्यवेळीं संधि साधून तुटून पडावयाचें अशा तऱ्हेची फार मोठी योजना होती व या खेपेची त्यांची तयारीहि परिपूर्ण होती. चतुर नबाब सुलतान इब्राहिमनें कुणाकडे तरी बरेंच वजन खर्च करून मोरक्को, अल्जिरिया येथील अमेरिकन कंपनीबरोबर २ कोटी पौंडाचीं शस्त्रास्त्रें पुरविण्यासंबंधीचा करार केला होता व तदनंतर १८७७ मध्यें बडोदा आदि विभागांत हिंडून ११ हजार जवान यात्रेकरूंच्या वेषांत मक्का येथें जमण्याची पक्की योजना पक्की केली होती. तसेंच भारतांतील कित्येक राजेराजवाड्यांनीं या कामीं सहाय्य देण्याचें कबूल केलें होतें. ब्रिटिश सरकारचें अभेद्य तख्त ज्वालामुखीच्या विस्फोटाप्रमाणें फोडून टाकण्याचा त्यांचा अखेरचाच परंतु जोरदार यत्न होता. हा प्रयत्न जर यशस्वी झाला असता तर आज वेगळाच इतिहास दृष्टीस पडला असता.

### क्रांतिवीरांच्या कार्याचा सर्वनाश

' परंतु होणार जे चुकेल ना कधीं ' म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. नबाब सुलतान इब्राहिमच्या थोड्याशा असावधानतेनें फारच मोठा घोटाळा झाला. त्याचा मुंबईमधील मित्र दिलावर हुसेनला ही बातमी कळतांच त्यानें तात्काळ ही बातमी इंग्रज सरकारच्या कानीं घातली व ब्रिटिश सरकारला जागें केलें व नानासाहेब व त्यांचे इतर साथीदार ज्या क्षणाची आतुरतेनें वाट पहात होते ती वेळच इंग्रज़ सरकारनें वेळींच दक्षता घेतल्यानें येऊं दिली नाहीं. अगदीं ऐनवेळीं तोंडातला घास काढून घेतला. त्याची योजना हाणून पाडली. नानासाहेब व त्यांच्या इतर साथीदारांना हात चोळत बसावें लागलें. तशांतच नानांचे प्रमुख साथीदार अजिमुल्ला व शहाजादे फिरोजशहा तसेंच नेपाळचा राणा, नानांना वेळोवेळीं अप्रत्यक्षरीत्या मदत करणारे राणा जंगबहादूरहि याच सुमारास मरण पावले. त्यामुळें नानासाहेबांचा धीरच खचला. त्यांच्यात आतां पूर्वीचा जोम, तडफ राहिली नाहीं. कारण आतांपर्यंतच्या त्यांच्या साऱ्या परिश्रमावर पाणी पडलें होतें. कठोर, कर्दनकाळानें अशा रीतीनें नानासाहेबांवर निर्घृणपणें सूड उगवून काय बरें साधलें ?

दैवच जर फिरलें त्याला नानासाहेब काय करणार ? दैवानं नानासाहेबांचा पिच्छा पुरवून त्याचे सारे बेत उधळवून लावले. दैवगतीपुढें नानाना हार खावी लागली. आयुष्यांत त्यांना जबरदस्त पराभव पत्करावा लागला. त्यांची एवढी जबरदस्त मानहानी झाली होती कीं यापुढें आणखी कितीहि प्रयत्न केले तरी ते सफल होणार नव्हते. या निराशेच्या भावनेनें प्रेरित होऊन ते आपलें काळें तोंड परत कुणाच्या नजरेस पडूं नये म्हणून निघून गेले.

●●●





## भीष्माचा डोंगर

...पान १६ वरून

'धन्यानूं, मी म्हटलं कां काहीं!'

'अरे, आमची सगळी भिस्त तुझ्यावर. कामच तसं आहे. बंड्याला म्हटलंच मी धर्म्यानं मनावर घेतलं पाहिजे. दुसऱ्या कोणाला नाहीं जमणार.'

बंड्या नाबरानं अर्धवट दुजोरा दिला आणि मध्यंच पाचर मारली, 'अरे पण हा भडवा नाहीं कबूल व्हायचा. त्या रांडेचं सूत, तिथंच हें भूत.'

धर्म्याला नाहीं आवडलं. म्हणजे बाकी कोणी बोलता तर एकवेळ चाललं असतं. पण बंड्या नाबरानं असं बोलायला नको होतं.

उसळून तो उलट जाब करणार होता. पण द्वारक्यानं त्या आधींच बंड्याला जामला. वैतागानं म्हटलं, 'बंड्या, हात जोडतो बाबा! जरा गप्प बैस. प्रसंग काय? कां धर्म्याच्या मागं लागला आहेस?

'गरीब मी. काय? कोणीही मागं लागावं. दुसरी नाहीं, पण तोंडाची खाज तरी भागते.' धर्म्या रुख्यानं बंड्याचं बिंग फोडलं. बत्तीशी फाडून तो गहीवरून हंसला आणि मग अंगांत वारं भरल्यासारखा तडक चालूं लागला.

'धर्म्या—'हाताला धरून द्वारक्यानं त्याला रोखला. त्या धक्क्यानं दोन्ही डबड्यांतलं पाणी डुचमळून एकदम बाहेर सांडलं.

'टायम नाहीं.' धर्म्याचा भाव वधारला होता.

'उपकार कर धर्म्या' द्वारकानाथ विनवूं लागला.

'छाः छाः! बोलूंच नका.'

'अरे माझ्यावर नाहीं. उभ्या गांवावर.'

'आं!'

'पांडवांचा जसा श्रीकृष्ण तसा—'

'मी देव नाहीं.' धर्म्या स्वतःशीं पुटपुटला.

'आमचा वकील तूं' द्वारक्यानं वाक्य पूर्ण केलं.

'बंड्या नाबर इतका वेळ मुकाट ऐकत होता. त्याला रहावेनाच. गुरगुरत तो म्हणाला, 'भांचोद्, मोफत नको करूंस. काय ते पैसे घे.'

धर्म्याला चटकन् समजण्यासारखी ही भाषा होती. पैशांचा उल्लेख आला तसा त्याचा विरोध थंडावला. अंतरींचा त्रस्त संमंध शांत झाला. टाळक्यांत चिलकत बसलेली पाल चूप झालीं. घरंगळलेल्या आवाजांत त्यानं म्हटलं, 'मग हें आधीं नाहीं सांगायचं? मोफत टायम खाल्लांत.'

खिशांतून रुपयाची एक नोट काढून बंड्यानं धर्म्याला फक्त दाखवली आणि पुन्हा ठेवून दिली. आणि मग टेंचांत म्हटलं, 'एक पत्र देऊन ये त्या उलट्या खोपडीच्या मॅनेजरला आणि मग ही नोट घेऊन जा.'

'त्या गोळ्याला?' धर्म्यानं विचारलं.

'गोळा किंवा खुळा कोण असेल तो!' अधिक बोलायला बंड्या नाबर तयार नव्हता.

पाण्याचे डबडे धर्म्यानं तिथंच वडाखालीं नीट बाजूला ठेवून दिले. 'हातबित लावाल तर बघा! वडावरचा नितकारी बघून घेईल! त्यानं पोरांना तंबी दिली आणि मग द्वारक्या कुळकर्ण्यानं दिलेला बंद लिफाफा घेतला आणि तो निघाला. पायवाटेनं, मधल्या उबड्या तळपीवर.

## ९

समोर तिकडे उजाड माळवदावर मोठी धमाल माजून राहिली होती. पांचपंधरा माणसं वावरत होतीं. विशेष म्हणजे त्यांत एकसुद्धां गांवांतला नव्हता.

म्हाताऱ्या अण्णागुरुजीला याच गोष्टीचं राहून राहून दुःख होत होतं. आणि कंपनीचा मॅनेजर राजाभाऊ गोळे आपल्या अर्धवट साहेबी भाषेंत त्याची समजूत काढीत होता.

ही अशी–'यू डोन्ट नो! तुम्हांला कळत नाहीं अण्णागुरुजी! कंपनीचं प्रेस्टीज, म्हणजे पतींचा प्रश्न आहे. लोकल पीपल आर युसलेस. काय? हीं गांवठी माणसं कांहीं कामाचीं नाहींत. म्हणून मुंबई, बेळगांवकडचे एक्सपर्ट कारागीर बोलावून घेतले मी. यू नो, आय पे देम दहा ते पंधरा रुपये पर डे. आहांत कुठं?'

'हिथं, याच गांवांत.' बिनभिवयाचे डोळे फिरवीत अण्णागुरुजी जाब करीत होता आणि डोक्याचा भार मानेला जड झाला होता म्हणून कीं काय, सारखी मान हलवीत होता. पण म्हाताऱ्याची समजूत पडत नव्हती. ती पडणं शक्यही नव्हतं. गांवचीं कामं बाहेरच्या लोकांनीं करावींत ही गोष्ट त्याला साफ नामंजूर होती. यांत त्याच्या गांवचा अपमान होता आणि कंपनीची गांवच्या लोकांबद्दलची बेपर्वाई वृत्ति दिसून येत होती. अण्णागुरुजीला दोन्ही बिलकूल नापसंत होतं.

आणि म्हणूनच तो पुन्हा न् पुन्हा सांगत होता, 'गांवचं कोणींच नाहीं ही गोष्ट बरी नाहीं झाली गोळेसाहेब.'

बाजूला खास मंडप उभा होत होता. तिकडे विजयची देखरेख चालली होती. मुंबईहून मुद्दाम बोलावून घेतलेले कसबी कारागीर जिद्दीनं वावरत होते. खर्चाचा प्रश्नच नव्हता. कंपनी चांगली मातबर होती. दोन्ही मालक लक्षाधीश होते. बँकांत पैसा कुजत होता तो त्यांनीं इकडे खाणींत ओतला होता, इतकंच!

गांवांत कंपनीचा आज जाहीर प्रवेश होणार होता. इतके दिवस येणार, आली म्हणून जो गाजावाजा होत होता तो अखेर आज खरा होणार होता. अर्थात ही एकच गोष्ट महत्वाची होती. प्रथमदर्शनींच कंपनीला गांव जिंकायचं होतं. आपल्या वैभवानं गांवाला दिपवायचं होतं, ऐश्वर्यानं लोकांना चकित करून सोडायचं होतं. एकदां हें झालं आणि तें देखील पहिल्याच फेरींत कीं मग गोळेसाहेब डरत नव्हता. पुढची त्याला काळजी नव्हती. कंपनीचं भवितव्य त्याच्या हातांत त्याला स्वच्छ दिसत होतं...

मंत्र्यासाठीं तांबडमाती टाकून खास तयार केलेल्या रस्त्यानं धर्म्या येत होता. आंब्याच्या पानांनीं व सुरूच्या अन् कोरल्या माडाच्या फांद्यांनी दाटलेलीं आणि नटलेलीं तोरणं जागोजाग टीकठाक उभी होतीं. वर झिळमिळ पताका सप्तरंगांत खुलत न् झुलत होत्या. 'कंपनी चिरायु होवो,' 'सुस्वागतम्,' 'वेलकम्' अशी जाहिरात करीत भडक रंगांतील कापडी घोषणा फडकत होत्या. धर्म्याला वाचतां येत नव्हतं. आणि तरीसुद्धां डोळे फाडून तो उगाच या घोषणांकडे बघत-राही.






खरं म्हणजे हा एकंदर थाटमाट बघूनच तो अर्धामुर्धा झाला होता कसं न् काय, सगळंच त्याला अजब झालं होतं. छाः ! त्याच्या हें बघण्यांतलं नव्हतं. कांहीं आगळं दिसत होतं, विलक्षण भासत होतं– त्याची नजर त्याला पावलाला बजावीत होती...प्रवेशद्वारापाशीं आला आणि मग मात्र बेटां थांबलांच ! तोंडांत बोट घालून लहान पोरासारखाच सोन्यारुप्याच्या बनावट तेजांत लखलख तळपणाऱ्या त्या दाराकडे बघत राहिला. विचार नाहीं, विकार नाहीं त्याची समाधीच लागून राहिली. मति गुंग झाली. साक्षात्कार झाल्यासारखा तो तनमन गुंतून बसला. हा प्राणी मुळीं स्वतःलाच विसरून गेला तर आणिक कशाची शुद्ध रहाणार ?

नशीब धर्म्यांचं ! आणि तें मात्र वाईटावर होतं. राजाभाऊचं नेमकं त्याच्याकडे लक्ष गेलं. तसा कंपनीचा हा मॅनेजर खवळून ओरडला, 'ए साला, हू आर यू ?'

नारळाच्या झाडावर चोरी करतांना पकडावा तसा धर्म्या दचकला. त्याच्यासारख्या फाटक्या माणसानं या नवलनगरींत येणं, आणि आशाळभूत नजरेनं तसं बघत रहाणं गुन्हा होता. होय, आणि त्यालाही तो कबूल होता.. उगाच नाहीं, धर्म्या पार गडबडून गेला. गांगरला अन् इकडे तिकडे बघूं लागला. उत्तर द्यायला गोळेसाहेबाचा प्रश्न त्याला कळलाच नव्हता. त्याच्या कानावरून नुसताच गडगडाट गेला. कसला न् काय ? अशा परिस्थितींत विचार करायला तो थांबतो कशाला ? आणि मग नेहमीं जें व्हायचं तेंच झालं ! वाट फुटेल तसा आणि पाय नेतील तिकडे धर्म्या पळत सुटला. जातो कुठं ? वाट नव्हतीच आणि पायसुद्धां दोनच !

मागं राजाभाऊ गोळ्याची एकच हाकाटी सुरू होती–

'अरे साबॉटेज, दगा–दगा ! धांवा, पकडा त्याला सोडूं नका...'

या अशा गर्जना चालू होत्या. आणि धांवपळ......

चारीकडू पंधरावीस माणसं तरसासारखीं पाय ओढत वसवसून आलीं. त्यांनीं धर्म्याला घेरलं. बिचाऱ्याची कोंडी केली. एक वरचा मार्ग तेवढा मोकळा होता. तो आपला त्यांच्या तोंडाकडे बघत राहिला. इतक्या लोकांत एकही चेहरा त्याच्या ओळखीचा निघेना. सगळेच नवीन, परके.

आणि झालं ! या कल्पनेनंच धर्म्या गर्भगळित झाला. त्याचा थरकांप उडाला. हातपाय गाळून तो जागच्याजागीं बसला. त्यानं गळा काढला, 'दुनिया बऱ्याची नाहीं, खऱ्याची नाहीं.'

चांदीच्या मुठीची काठी मिरवीत राजाभाऊ गोळे तोंवर तिथपर्यंत पोंचला होताच. अंग चोरून आणि मान टाकून उसासत पडलेल्या धर्म्याला बघून कंपनीचा मॅनेजर द्रवला नाहीं. त्याच्या रडण्यागांगरण्यानं गोळ्याच्या काळजांत चीर पडली नाहीं. या क्षणाला तरी स्वतःच्या पराक्रमावर तो खुष होता. नेहमीच असायचा. फक्त आतां कारण होतं होय, या हरामखोराला राजभाऊनंच पाहिलं होतं. प्रेवशद्वारावर. बेरड कांही उद्योगांत होता. गोळेसाहेब सावध नसता आणि वेळींच त्याचें तिकडें लक्ष गेलें नसतं तर नक्कीच कांहीं घातपात झाला असता ! संशय घ्यायचंही कारण नव्हतं.

'अरे पकडा बदमाशाला. मुसक्या बांधा.' राजाभाऊ हुकूम सोडत होता.

तशीं दोघेचौघे पुढं झाले. झेंप टाकून धर्म्याला त्यांनीं धरलं. गचांडी देऊन उभा केला. धर्म्याला त्राण होतं कुठं ? भिऊनच तो साफ मुडदा झाला होता. एकाद्या बुजगावण्यासारखा कसाबसा उभा होता.

म्हणजे अण्णागुरुजीनं आणि विजयनं सुद्धां इतका वेळ या धर्म्या रुद्याला ओळखलंच नव्हतं. राजाभाऊचा एकंदर अवतार बघून त्यांना वाटलं काय झालं आणि काय नाहीं ! छातींत गोळी शिरावी किंवा टाळक्यावर धोंडा पडावा तसा एकाएकीं आकांशातून गोळेसाहेब ओरडूं लागला. तेव्हां ते सुद्धां हबकले, जाम चरकले.

पण बघतात समोर तर धर्म्या ! गांवांत कुत्रंसुद्धां याला भीत नाहीं. रस्त्यानं जाऊं लागला कीं तींच याच्या अंगावर येत. आणि हा मागच्यामागं पळत सुटे. तर हा असा जरत्कारू ! आणि या माणसानं एका बड्या कंपनीच्या मॅनेजराची दाणादाण करावी–यापरतं दुनियेंत दुसरं नवल कोणतं ? असलंच तर अण्णागुरुजीला तें माहीत नव्हतं. म्हाताऱ्यानं कपाळावर हात मारून घेतला.

'धर्म्या–धर्म्या, भांचोद तूं रे ?' तो ओरडला आणि खोः खोः हंसूं लागला.

विजयला असं हंसता येत नव्हतं. उगाच साहेब बिघडायचा ! शिस्तीबद्दल नाहींतरी राजाभाऊंच्या तशाच तऱ्हेवाईक कल्पना होत्या. मुष्कीलीनं विजयनं हंसूं आवरलं. मात्र आपल्या लोकांना सांगितलं, 'सोडा त्याला.'

पण तरीसुद्धां गोळेसाहेब उखडलाच. घारे डोळे बारीक करीत कुर्र्यांत त्यानं विजयला ऐकवलं, 'यू शिर्के, साहेबाच्या ऑर्डर्स फिरवतां म्हणजे ? ग्रॅज्युएट तुम्ही, साधं डिसीप्लीन नाहीं ठाऊक ?'

'पण साहेब–' विजय बोलला.

'से सर. आमचं नांव घ्यायचं नसतं. साहेब म्हणजे युअर हसबंड ! काय ? ध्यानांत ठेवा.' राजाभाऊ खांदे उडवीत म्हणाला.

'पण सर, या माणसाला मी ओळखतों. बिचारा अगदीं गरीब आहे.'

'शिर्के, गरीब माणसंच अधिक डेंजरस. फॉर मनी वाटेल तें करतील.' गोळ्याचा सिधान्त.

आतां मात्र अण्णागुरुजीला तोंड फुटलं, 'अहो तुम्हांला काय शहाणे म्हणायचे गोळेसाहेब. या धर्म्यासारखा नालायक माणूस दुसरा शोधून नाहीं सापडणार. लग्नाची बायको ताब्यांत नाहीं याच्या. गांवांत लोकांना लागू–काय ? आतां हा असला माणूस कोणाचं आणि काय वाईट करणार हो ? आं ! सोडा त्याला.'

'याची बायको गांवांत लोकांना लागू.' राजाभाऊ गोळ्याला ही गोळी बरोबर लागू पडली होती. म्हणजे धर्म्याच्या नालायकीबद्दल त्याची एकदम खात्री झाली. माणसाला कमींत कमी स्वतःची बायको सांभाळतां आली पाहिजे. कारण ती हक्काची असते. मिळवायला पराक्रम लागत नाहीं.

डोळे मिचकावीत त्यानं धर्म्याला विचारलं, 'कोण रे तूं ? पुरुष तरी आहेस ? का हिजडा ?'

जाब दिला विजयनं. सांगितलं, 'धर्म्या तो. दाजी नाबराकडे कामाला असतो.'






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



'दाजी नाबर ! तो तुमचा कंट्री गांधी-मॅडकॅप !' इति गोळेशा न 'गाढव आम्ही म्हणून त्यां वेडपटाला भेटून जाण्यासाठीं तीन वेळा निरोप धाडला. लेकानं काय जाब द्यावा—कारण नाहीं.'

'देईल तर काय झालं ? दाजीला नाहीं कोणाची पर्वा ' अण्णा गुरुजींनं मल्लीनाथी केली.

'त्याला नाही, तर आम्हांला पण नाहीं. असले शंभर दाजी पाहिलेत या राजाभाऊनं.'

'हा नाहीं त्यांतला ', म्हाताऱ्या अण्णानं कौतुकानं निर्वाळा दिला. ' कळेलच म्हणा !'

आणि राजाभाऊ गोळ्यानं मध्येंच चुटकी वाजवली. टाळक्यांत कांहीं कल्पना आली असावी. त्याच्या घाऱ्या डोळ्यांत काळी चमक भरली. कपाळावर मधोमध शीर उठली.

चांदीच्या मुठीची काठी जमिनिवर आपटून तो खुर्चीत ओरडला, 'सरें याला सोडूं नका. ॲरेस्ट करून ठेवा.'

'सर तें पोलिसांचं काम.' विजयनं हळूंच सुचवलं.

'आय नो ! बोलवा पोलीस. याला त्यांच्या ताब्यांत द्या.'

'पण हा अण्णागुरुजी विचारतो कां हो ?' म्हातारा चवताळला.

रास्कल मंडप पेटवून देणार होता. 'गोळेसाहेबानं आरोप केला. कार्डबोर्डांच्या गटला काडी लावीत होता, तर मी ओरडलों. तसा धुमस्टार्टेड रनिंग.'

आपल्या विरुद्ध हा खोटाच आळ ऐकून धर्म्या-रुद्रे ऊर फोडून किंचाळला, 'नाहीं, नाहीं अण्णा ! गळ्याच्यान् नाहीं ! पोरीची शपथ नाहीं ! फक्त बघत होतों—बघत होतों काय ? काडी लावायला पेटीतरी आहे काय हो माझ्याकडे ? बघा, झडती तरी घ्या ! मोठीं माणसं तुम्ही. गरीब झालों म्हणून फुकट आळ काय घेतां हो ?' उद्वेगानं हात वेडेवाकडे नाचवीत तो बडबडत सुटला.

'ही पेटी.' कोटाच्या खिशांतून आगपेटी काढून दाखवीत राजाभाऊ थंडपणं म्हणाला.

खोटं. आणि हें सगळ्यांना माहीत होतं. कारण ती काड्यांची पेटी त्याचीच होती. पण मोठा माणूस पडला. तूं खोटं बोलतोस म्हणून त्याला तोंडावर सांगणार कोण ? आण्णागुरुजी देखील मूग गिळून गप्प बसला. जळफळत हात चोळूं लागला.

'ही पेटी त्या गेटवर सांपडली मला. यानंच टाकली असणार' एक पचली, तसा गोळेसाहेब बेशक थाप मारीत होता. त्याची जीभ थोडीसुद्धां कचरत नव्हती ! तुमच्या दाजी नावरानंच धाडला असावा याला माय गेस काय ? खरखोटं पोलिसांत बाहेर येईलच ! यू नो.'

कंपनीचा हा थेरडा असा बाष्कळ बकवा करूं लागला आणि बोलतां बोलतां तो मध्येंच थांबला. बक्यासारखी त्याची मान एकदम उंच झाली. आणि मग गोरा गरगरीत चेहरा तजेल झाला. फिकट घाऱ्या डोळ्यांत रक्त साकळलं आणि भान हरपून तो ओरडलाच, 'ओ होऽ तूंऽऽ ?'

'होय ! मीच म्हटलं, 'सावित्री च्यार पावलं दूरच थांबली. आवाज चढवून तिथून म्हणाली, 'शेट, कामांत आहांत काय हो !'

तिचा आजचा नट्टापट्टा कांही और होता. लाल भडक धारीचं नऊवारी इरकला ती नेसली होती. चापचोपून झाडाची साल तशी ही साडी तिच्या टच्च, रसरशीत शरीराला बसली होती. छाती अर्धीमुर्धी झांकील अशी धारवाडी खणाची चोळी अंगांत घट्ट बांधलेली, दंडांत रुतलेली. भरगच्च केसाचें चक्कर, वर अबोलीचा वळेसरं.

गोळेसाहेबांच्या डोळ्यांची मारपीट चालली होती. तिच्या बोलण्याकडे लक्ष नव्हतं.

सावित्रीच्या प्रश्नाला उत्तर दिलं अण्णागुरुजीनं. वैतागून सांगितलं, 'होय रांडे ! या धर्म्याला पोंचविण्याच्या कामांत आहे तुझा शेट. त्याला चावडीवर आणि मग मसणांत पोंचवायचा बेत दिसतो तुमचा. कारण मग तूं मोकळी—'

'अण्णा, नवऱ्याचं नांव घ्यायचं काम नाहीं.'

'तसा अण्णागुरुजीचा एकदम स्फोट झाला. केव्हांपासून म्हातारा आंतल्या आंत जळत आणि धुमसत होता. राजाभाऊं गोळ्याला सणसणीत कांहींतरी सुनविण्यासाठीं वळवळत होता, बेत करीत होता आणि मोडीत होता. त्याला हवी तशी संधि मिळाली. नाहींतरी नाटकीच. आवेशाचं त्यानं जाम नाटक केलं. झपाटल्यासारखा सावित्रीच्या अंगावर अण्णा धांवून गेला. सरळ तिच्या बखोटीला हात घातला. ओढत धर्म्यासमोर आणून तिला उभी केली आणि मग तुच्छतेनं म्हटलं, 'हात् रांडे ! हा तुझा नवरा आणि ही तूं ! डोळें असले तर बघ. तोंड असलं तर बोल.'

सावित्रीला डोळेही होते आणि तोंडसुद्धां. ती फणकाऱ्यानं धर्म्याला म्हणाली, 'तुझं आणीक काय काम हिथं ? मी आहेच कीं एक !'

'ह्यांनीं धरून ठेवला ग.' धर्म्यानं रडव्या स्वरांत तक्रार केली. काय असेल तें असो, बायको दिसली आणि त्याच्या जिवांत जीव आला. त्याला थोडा धीर आला. शब्द सुचूं लागलें. बोलणं जमूं लागलं.

'तें रे कां ? नोकरीवर घेतों म्हणतात ?' तिनं उलट प्रश्न केला.

'छाः ! मी बरा जाईन ! भांचोद, काय नाहीं तो आळ घेतात ग ! म्हणतात पोलिसांत देतो ' धर्म्या म्हणाला.

'हात्तेची !' मानेला हिसडा देऊन सावित्री गर्कन मागं फिरली. कमरेवर हात घेऊन लचकत न् मुरकत एकएक पाऊल टाकीत ती गोळेसाहेबाच्या पुढ्यांत येऊन उभी राहिली. पदर दातांत. तोच चावत हंसून तिनं विचारलं, 'काय हो शेट ?'

'तुझा नवरा इज ए फूल.' राजाभाऊ मिटक्या मारूं लागला.

'फूल असेल, नाहींतर दगड असेल. पण म्हटलं ह्या सावित्रीचा नवरा आहे तो.' तिनं तिरपा डोळा टाकला. उगाच पदर चाळवला.

'अग पण यानं मोठाच गुन्हा केलाय. चक्क मंडपाला आग लावायला निघाला होता.—'

त्याला पुरतं बोलूं न देतां सावित्री अंग वुसळून जोरांत हंसली, 'हः हीः ! शेट, काय सांगतां ? कसा विश्वास बसावा. माझा हा मुंडदा असा पराक्रमी निघता तर मी हो लोकांच्या तोंडाकडे कां पाहिलं असतं ?'

'मग म्हणणं काय तुझं ?' राजाभाउनं विचारलं.







अनुक्रमणिका

'सोडा त्याला.'

'पण—पण—' गोळेसाहेब आढेवेढे घेऊं लागला.

'निघालें मी.' सावित्रीची धमकी.

'याला सोडलं कीं दाजी नाबर पण सुटतो.' राजाभाऊनं खरी अडचण सांगितली.

'आं ! म्हणजे हो शेट ?' सावित्री खरोखरच दचकली.' दाजींना पण धरलंत कां काय ?'

'अजून नाहीं. पण जातो कुठं ?' छाती फुगवून गोळेसाहेब म्हणाला. 'अग त्याचंच हें कारस्थान. मंडप जाळून दुपारचा कार्यक्रम बंद पाडायचा बेत होता त्याचा.'

'वया, बेया—' आणि सावित्री ओढ्याच्या पाण्यासारखी खळखळून हंसली. तशीच खद्खदत अन खिदळत राहिली. हंसूं आवरेनाच तिला.

'हंसतेस काय ?' राजाभाऊ नाराज झाला. रागाला आला.

'शेट, हंसूंच येतं तुमचं.' ' सावित्रीनं सांगितलं, 'मीच नाहीं, गांवांत सगळींच हसतील. हां !'

आणि तसा एकदम सावित्रीचा बेत ठरला. ती गंभीर झाली. पदरानं तिनं तोंड पुसलं. पदर नीट खोंचला. गोळेसाहेबाकडे नजरही न टाकतां तडक ती जायला निघाली.

'निघालीस.' राजाभाऊनं कासावीस होऊन विचारलं.

'होय ! जायलाच हवं.' तिनं तुटकपणं म्हटलं, चावडीवरच भेटूं ?'

'म्हणजे ?'

'पोलिसांत तक्रार देणार मी. तुम्ही माझ्या नवऱ्याला धरलंत म्हणून. खरं कारण सांगणार मी पोलिसांना.'

'काय ?'

'घरांत एकटी बघून काल सांजाला गोळेसाहेबानं माझ्यावर बलात्कार केला.' सावित्रीनं बेधडक सांगून टाकलं.

'अग–अग, काय वाटेल तो आरोप करतेस ? घरदार, कुटुंब असलेला प्रतिष्ठित माणूस मी.' गोळेसाहेब उसळून ओरडला, 'आणि केलास तरी कोण विश्वास टाकणार ? कुत्रा ?'

ती त्याच्याच आवाजांत म्हणाली, 'तुमच्या शब्दावर जीं लोकं टाकतात तीच. तसा पुरावा भक्कम आहे माझ्यापाशीं. साक्षीदार पण खूप. हा अण्णागुरुजीच देईल साक्ष.'

राजाभाऊनं म्हाताऱ्याकडे पाहिलं. मोठ्या कौतुकानं तो सावित्रीकडे बघत होता. म्हणजे पोर अगदींच कामांतून गेलेली नव्हती. काळीज होतं तिला. आणि मुख्य म्हणजे डोकं. उगाच नाहीं–या गोळेसाहेबाला कसा बरोबर पेंचांत धरला होता तिनं. अण्णा खुष झाला. या सावित्रीवर बेहद्द खुष झाला.

तोंड पुसण्यासाठीं कमरेचं सोडायला राजाभाऊ गोळे गाढव नव्हता. तसा तो धूर्त होता, दूरदर्शी होता. त्याचा नाइलाज होता. त्याच्या हें तेव्हांच लक्षांत आलं. मोकळेपणानं त्यानं पराभव पत्करला. सावित्रीला सांगितलं, 'माझे आई, पाया पडतो. चावडीवर जाऊं नकोस.'

आणि विजयकडे बघून त्यानं हुकूम केला, 'सोडा त्याला शिर्के. लेट हिम गो.'

पण सरळ जायला धर्म्या रुद्रे कुठं तयार होता ? हात लांब करून त्यानं आळस दिला. वाकड्या डोळ्यानं कंपनीच्या मॅनेजरला नीट बघून घेतलं. फाजीलच तो. उगाच हसला, खाकरला.

'आतां जा की रे ?' सावित्रीनं म्हटलं.

'अग पण काम कुठं झालं आहे ?'

'काम ?' राजाभाऊ घोगऱ्या आवाजांत पुटपुटला.

'होय. ही चिटी कोण देणार. राहिली ती राहिलीच. टायम नाही झाला.' आणि कनवटीला खोंचून ठेवलेलं पत्र त्यानं काढलं. राजाभाऊंच्या हातांत दिलं.

'कोणाची ?'

'काय करायचं आहे ? वाचा ती.' धर्म्यानं जाब केला. 'बरं येतो मी. टायम नाहीं. दाजी नाबराचं पाणी राहिलंय अजून. राम राम !...'

धर्म्या वाटेला लागला. इतकं झालं होतं. पण त्याला मा[illegible] कशाचं कांहीं नव्हतं. खेद आणि खन्त गाळून न् गिळून तो राहि[illegible] होता. आणि म्हणून अजून जिवन्त होता. नेहमीसारखाच कोऱ्या मनानं आणि हंसऱ्या चेहऱ्यानं तो चालला होता. आणि आजत[illegible] त्याची लहर लागली होती. तोंडानं तो गाणं गुणगुणत होता—

अबोलीचा वळेसर डोईवर ग
शेटजी बोलावतो माडीवर ग...

मागं तिकडे तळपीवर राजाभाऊ गोळे तावातावानं पत्र वाचीत होता. तिसऱ्यानं. आणि प्रत्येक खेपेला त्याचं टेंपरेचर चढत होतं, ब्लड प्रेशर वाढत होतं. बाकीचीं लोकं चूपचाप ऐकत होतीं. बोलणार तरी काय ?

...अरे गोळ्या, तुझा फुटला डोळा. चिरला गळा. कळविण्यास आनंद वाटतो कीं ईश्वरकृपने गांवच्या वेशीवर नाग चावून कंपनीचा तडकाफडकी प्राण गेला. लांडया-गुजराच्या चोरट्या पापचं फळ [illegible] दळभद्रं कारटं. त्याला जाळावं का पुरावा याबद्दल बरीच चर्चा होऊन अखेर त्याला जाळण्याचाच निर्णय गांवकऱ्यांनी घेतला आ[illegible] तूं या कारट्याचा एक आप्त, म्हणून आमंत्रण केलं. आज दुपारी चार वाजतां 'कंपनी'च्या प्रेताची मिरवणूक निघेल. मढ्याला खांदा द्यायला अवश्य येण्याचं करावं.—

आपले,
**समस्त रेडीग्रामस्थ**

●●●

## खुलासा

या अंकांत श्री. आत्माराम निलकंठ यांच्या 'जय नांवाचा इतिहास' या लेखमालेवरील वाचकांची प्रतिक्रिया आम्ही देणार होतो. परंतु स्थलाभावी या अंकांत ही प्रतिक्रिया देता आली नाहीं. तरी ती पुढील अंकांत देण्यांत येईल.

—संपादक



अनुक्रमणिका




दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तकें पाठवितांना नेहमीं २ प्रति पाठवाव्यात म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते.

—संपादक

• अर्वाचीन मराठींतील खंडकाव्यें • स्वप्नजा • भावनांचें विश्व

## मर्मग्राही ग्रंथरूप ओयासीस

**अर्वाचीन** मराठींतील खंडकाव्यें :हा प्रिं. ह. कि. तोडमल यांनीं पुणें विद्यापीठाच्या पीएच्. डी. पदवीसाठीं लिहिलेला प्रबंधरूप ग्रंथ होय. खंडकाव्याच्या अभ्यासासाठीं त्यांनीं इ. स. १८५० ते १९५० हा एका शतकाचा कालखंड निवडला असून या कालखंडांत निर्माण झालेल्या विविध प्रवृत्तिपर खंडकाव्यांचा परामर्श घेणें हा प्रस्तुत प्रबंधाच्या अभ्यासाचा प्रमुख उद्देश आहे.

विषयप्रतिपादनाच्या सोयीकरितां श्री. तोडमल यांनीं ग्रंथाचे दोन विभाग कल्पिले आहेत. पहिल्या विभागांतील पांच प्रकरणांतून खंडकाव्यविषयक प्रास्ताविक माहिती तथा खंडकाव्याचें इतर काव्यप्रकाराशीं तुलनात्मक विवेचन करून त्याचीं वैशिष्ट्यें व वेगळेपणा दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे. दुसऱ्या विभागांत खंडकाव्यांचें पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक आणि कल्पनारम्य खंडकाव्यें असें वर्गीकरण करून या वर्गीकृत खंडकाव्याच्या कक्षेंत मोडणाऱ्या अर्वाचीन खंडकाव्यांची स्वतंत्र चर्चा केली आहे. शेवटीं अकथात्मक खंडकाव्याचें एक परिशिष्टहि जोडलें आहे.

प्रचलित वाङ्मयप्रकारांच्या तुलनेनें खंडकाव्यासंबंधीं सविस्तर चर्चिलेला असा उल्लेख करण्यासारखा ग्रंथ मराठींत उपलब्ध नाहीं. त्या दृष्टीनें आजवर उपेक्षित ठरलेल्या या काव्यप्रकारावर एखादा परिशीलनात्मक ग्रंथ निर्माण होणें ही घटना मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना विशेषतः विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांना बहुतांशीं मार्गदर्शक ठरणार असून मराठी साहित्यांत एका नवीन ग्रंथाची भर पडली आहे; ही गोष्ट अवश्य नमूद केली पाहिजे.

अर्वाचीन मराठींतील खंडकाव्य किंवा कथाकाव्य हें दीर्घ परंपरेतून उदयाला आलेलें काव्य आहे. महाकाव्यापासून आख्यानकाव्य आणि कालौघाबरोबर साहित्यशास्त्रीय जुनें वृत्त-अलंकारादि संकेत विस्कळीत झाल्यामुळें खंडकाव्याची नव्यानें व्याख्या करणें ग्रंथकाराला आवश्यक वाटलें आहे. परंतु या व्याखेची बारकाईनें छाननी केल्यावर त्यांत अतिव्याप्तीचा दोष जाणवत नसला तरी अव्याप्तीचा दोष असल्याची गोष्ट लक्षांत येते. एखादें विशिष्ट औषध दर्शविणारें लेबल असलेल्या बाटलींत अन्य प्रकारचीं औषधें ओतून तीं मूळ औषधावत असल्याचा आभास निर्माण करण्यासारखा हास्यास्पद प्रकार एकाच व्याख्येच्या संदर्भांत समग्र खंडकाव्यांचें विवेचन केलें आहे.

खंडकाव्य काय किंवा कोणत्याही वाङ्मयप्रकाराच्या कलाकृतीचा बाह्यघाट हा पुष्कळसा साचेबंदपणाच्या चाकोरींत रुळलेला असतो. तथापि आविष्काराच्या पद्धति व्यक्तिपरत्वें विभिन्न असूं शकतात. वास्तव खंडकाव्य रचनेच्या संदर्भांत रचनाकारावर पडणाऱ्या मूलभूत बंधनांचें विस्तृत विवेचन ग्रंथांत अंतर्भूत असणें आवश्यक होतें. यद्यपि अशा आशयाचा मजकूर इतरत्र चर्चेच्या अनुषंगानें आला असला तरी अपेक्षित तपशीलाची संगतवार व सुसंबद्ध जुळणी एखाद्या स्वतंत्र प्रकरणरूपानें केल्यानें अभ्यासकांची अडचण दूर होण्यास सहजगत्या मदत झाली असती.

इंग्रजींत ज्या काव्यप्रकाराला Narrative Poetry म्हणतात तें कथनकाव्य व मराठींतील कथाकाव्य यांचे वाङ्मयीन निकष बहुतांशी एकच आहेत. परकीय साहित्यशास्त्राच्या खतपाण्यावर भारतीय साहित्यशास्त्राच्या कांहीं प्रमुख शाखा पुष्ट झाल्या आहेत. ही वस्तुस्थिति विचारांतीं मान्य केलीच पाहिजे. सांगायचा मुद्दा एवढाच कीं पाश्चात्य लेखकांत सुसेन के. ल्यँगर या अमेरिकन लेखिकेचे Narrative Poetry संबंधीचें विचार बरेच उद्‌बोधक आहेत. परंतु मराठीतेर लेखकाच्या उल्लेखांत तिचा नामनिर्देश मात्र कुठेंच आढळत नाहीं.

तात्पर्य, कांहीं गौण दोषात्मक भाग वगळला तर श्री. तोडमलांच्या स्वतंत्र चिकित्सक बुद्धीचा तथा विषयप्रतिपादनांतील व्यापक आणि मर्मग्राही दृष्टीचा प्रत्यय वारंवार येतो. एखाद्या अस्सल टीकाकाराचीं संपूर्ण अंगें सुस्पष्ट झालेलीं नसलीं तरी स्वतःशी मतभेद असलेल्या परमताचें खंडन करतांना ते अधूनमधून थोडीशी ताठार भूमिका घेतात वर्गीकृत खंडकाव्यांचा निरनिराळ्या प्रकरणांतून परिचयात्मक उहापोह केला असल्यानें खंडकाव्याच्या इतिहासाचें एक गतिमान चित्र डोळ्यासमोर साकार होऊं लागतें. विषयाला साजेशी प्रौढ व भारदस्त भाषा वापरली असूनहि विचार अभिव्यक्तिमधील सफाईपणा आशयाला मारक न ठरतां चांगलाच जाणवतो. विशेषतः पूर्वार्धातील दुसरें व तिसरें हीं प्रकरणें अर्वाचीन खंडकाव्याचा विकासात्मक आढावा अभ्यासण्याच्या दृष्टीनें महत्वपूर्ण आहेत.

आरंभीं म्हटल्याप्रमाणें मराठी वाङ्मयांत अशा प्रकारच्या ग्रंथाची उणीव प्रकर्षानें जाणवत होती प्रस्तुत ग्रंथनिर्मितीनें ती संपूर्णतः भरून निघण्यासारखी नसली तरी दुधाची तहान ताकावर भागविण्याचें समाधान किंवा खंडकाव्यविषयाच्या मरूभूमींत श्री. तोडमलांच्या या ग्रंथरूप-ओयासीसानें मराठी वाङ्मय

अनुक्रमणिका

संख्यां अभ्यासू-पाथस्थांचं अल्पांशानें कां होईना ज्ञानतृषा शमविण्याचें कार्य निःसंशय उपलब्ध केलें आहे, हेंहि कांहीं मोलाचें नाहीं. ग्रंथरचने मागील हेतु व आत्मीयता लक्षांत घेतां श्री. तोडमल हे अभिनंदनास अवश्य पात्र आहेत.

—प्रेमानंद वळवईकर

[ **अर्वाचीन मराठींतील खंडकाव्यें**:–ले. ह. कि. तोडमल, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणें; किंमत १५ रुपये. ]

●●●

## स्वप्निल मनोवृत्तींत रंगलेली "स्वप्नजा"—

अभिरुचीच्या बदलत्या युगांत आणि आशयघनतेच्या नव्या मनूंत मराठी कवितेची एका वेगळ्या दिशेनें वाटचाल होत आहे. ही दिशा बा. सी. मर्ढेकर, पु. शि. रेगे किंवा विंदा करंदीकर यांच्या कवितांतून प्रकाशित झाली आहे. अबोध जाणिवांची अर्धस्फुट अभिव्यक्ति ही नवकवितेच्या संस्कारमय संवेदनाक्षम व सौंदर्यस्पर्शी आविष्काराची मूलभूत प्रेरणा आहे. अत्यंत धूसर तरल आणि गतिमान ( dynamic ) जाणिवांना शब्दांकित करण्याची धडपड त्यांत आहे.

अशा कवींच्या काळांत कविता लिहून आपलं वेगळं वैशिष्ट्य टिकविणें हें अत्यंत कठीण आहे. पण पद्माबाईंनीं आपलं काव्य काळजीपूर्वक जोपासलं आहे.

'स्वप्नजा' हा त्यांचा तिसरा काव्यसंग्रह. यांतील बहुतेक सर्व कविता एका स्वप्नाळू मनोवृत्तींत लिहिलेल्या वाटतात. त्यामुळें साधारणतः प्रत्येक कवितेला त्या स्वप्निल स्थितीचा स्पर्श आहे. स्वप्न, तेंच कां फुलतें आहे, स्वप्नांनो, अवेळ स्वप्ना, आठवतें आठवतें, स्वप्नगौर, यासारख्या कवितांत त्या स्वप्नमय जाणिवेचा आविष्कार अधिक स्पष्टपणें दिसतो.

सारी पेटती झुंबरें
देठों देठीं फुलें वेल
येते निवाऱ्याला पुन्हा
उडालेली स्वप्नभूल

किंवा

अवेळ स्वप्ना या तंद्रींतील
नीलनगरच्या राजकुमारा
तटाआडच्या महालांत मी
उभी अशी झुकवींत पहारा

यां ओळींतून स्वप्नमय मनोवस्थेचें त्यांना वाटणारें आकर्षण किती तीव्र आहे याची कल्पना येऊं शकेल.

काळाच्या ओघांत धूसर झालेल्या ओल्या स्मृती हेंच या स्वप्नाच्या धुक्याचें मूळ आहे. यांतील बऱ्याच स्मृती अमूर्ताशी निगडित आहेत. वामनाच्या पावलांनीं येणारें दुःख आणि असीमाचे ओठ असलेला अलौकिक स्नेह हें त्या स्मृतींतील अमूर्त भाव होत. दुःखानें कवयित्रींचें मन दबून जात नाहीं. या दुःखाची आणि तिची इतकी जवळीक आहे की तें दुःख

माझे म्हणवीत आले
हीच आनंद वेदना

अशी आपुलकी निर्माण करतें. 'मजला तूं, तुजला मी' - अशी दुःखाची आणि तिची जन्मभरीची सोबत आहे. हे दुःख वाचाळ नाहीं. अबोलं आहे. उलट स्नेह मात्र बोलका आहे. दिशादिशांतून निसर्गाच्या कुशीकुशींतून हा अलौकिक स्नेह बोलका झाला आहे. चहुबाजूंनीं होणाऱ्या स्नेहाच्या वर्षावानें जेव्हां कवयित्रीचें हृदय कृतज्ञतेनें भरून येतें तेव्हां ती म्हणते—

अलौकिका ! स्नेहा ! तुला,
असे असीमाचे ओठ
आणि मीहि सदा अशी
भरलेली काठोकाठ.

अशा अमूर्त भावाभिव्यक्तिखेरीज वेगळ्या प्रकारची कविता यांत दिसते ती म्हणजे प्रीतिकविता. घार, नाचणमोगरी, सहल, शरदांतील चांदरात, वृथाच स्मरते, एक क्षण येतो, पूल, धाम तुझें या कवितांतील प्रीतिभावना हृदयस्पर्शी आहे. गतकालांतील आठवणींवर ती आधारलेली आहे. विविध रेशमी ब्यथांनीं ही प्रीतीचा गाथा लिहिलेली आहे. या स्मृती तिचा जीव अर्धामेला करतात; कधीं सहलींतला दुरावा मनांत हवीशी आग लावतो, कधीं एखाद्या चांदरातींत प्रियकराच्या सतत ध्यासांतून तो सहवासांत असल्याचा भास होतो. पण या सर्वांत नितांत भावमधुर आणि कल्पनासुंदर कविता म्हणजे 'पूल' आणि 'धाम तुझें.'

दोन प्रणयी जीवांमध्यें व्यवहाराची दरी असून देखील त्यांनीं भावबंधांच्या रेशमी धाग्यांचा पूल त्यावर बांधला. हे ऋणानुबंध असे कांहीं गुंफले गेले कीं कवयित्री म्हणते—

स्पर्शच झाला कातर बघुनि
त्या अद्भुत सौंदर्याला.

हे ऋणानुबंध ओलांडून आता दोघांतले अंतर कमी करणें अशक्य होऊन बसलं, म्हणून त्या पुलाच्या दोन टोकांवर दोघं खिळून राहिलीं.

धाम तुझें ही कविता प्रणयानुभूतीच्या एका वेगळ्या पातळीवरची आहे. प्रियकराच्या स्पर्शानें अगांगांत वीज सळसळते, तो सान्निध्यांत असला कीं थरदार भोवतालचं जग यांची शुद्ध हरपते त्या उन्मादांत तनमन. इतकें तन्मय होतें कीं

गंध तुझा श्वसनांत आणखी
जिव्हेवरती नाम तुझें
देहच सगळा धाम तुझें.

अशी अपूर्व एकरूपता निर्माण होते.

पद्माबाईंच्या कवितांच्या भावविश्वाचं हें अगदीं ओझरतं दर्शन आहे. त्यांच्या काव्यांत आशय आणि अभिव्यक्ति अभिन्न असतात व अशी अभिन्नता 'स्वप्नजा'मध्यें आढळते असे गोलमाल विधान मार्मिक किंवा आकर्षक वाटलं तरी तो निव्वळ थिल्लरपणाच होईल. पण पद्माबाईंची शब्दकळा किंवा कल्पकता इतकी विलोभनीय आहे त्यासाठीं असली वावदुकी अनावश्यक आहे. 'स्मृतीची घार', 'बर्फच होतें पाऊल', 'धुक्याची पक्षिण', 'चंद्ररसाचा घट', स्वप्नांचे झुळझुळते पडदे' अशा कितीतरी कमनीय कल्पना पानांपानांतून दाखवता येतील. या किंवा 'गालावरचा नित्र-सुगंधित रंग', 'पिसांपिसांतून पिसें उतरतें', 'मोत्यांच्या चुरम्याची चन्द्रकोर' 'कौतुक भिजलें वाक्य फुलांचे', 'अवेळ स्वप्नातंद्री' 'नभ भरलें नयन' या सारख्या अनेक प्रतिमांतून कवयित्रीच्या शब्दशक्तीची कल्पना येईल. क्वचित 'विजेची वेल' जरा अधिक पसरलेली वाटते, किंवा पक्ष्यांची प्रतिमा उगीचच जास्त घिरट्या घालते हें जाणवतें. धुक्याची पक्षीण, क्षणाचा पक्षी, यासारख्या त्याच त्याच आवर्तनांतून तें लक्षांत येईल. पण अशीं उदाहरणें अगदीं थोडी. गगनाला गवसणी घालणारी गडकऱ्यांची कल्पकता किंवा सागराचा ठाव घेणारी मर्ढेकरांची चिंतनशीलता या दोहोंपासून पद्माबाईंची कविता दूर असली तरी मनांतलें अबोध पण बोलून दाखवावेसे वाटणारे भाव स्वच्छंदपणें व्यक्त करण्याची सौंदर्यशाली (Romantic) भावनिर्भरता 'स्वप्नजा' या काव्य-संग्रहांत आहे एवढें सांगितलें तरी पुरें. कारण तेंच कवयत्रीचें खरें लेणं आहे.

मराठी कविता अतिरिक्त वास्तववादाकडून (Sur realism) पुन्हां सौंदर्यवादाकडे (Roman-

...पान ५९ वर




## पुण्यात्म्यांच्या पावन स्मृतीस शतशः अभिवादन !

हा ऑगस्ट महिना भारतियांच्या जीवनांतील स्वातंत्र्य स्मृतिचें एक इतिहास पर्वच म्हणावें लागेल. हा महिना भारतियांच्या स्वतंत्र जीवनांतील एक महान यज्ञ आहे. अमाप उत्साहाचा व आनंदाचा वेगळा दिवस आहे. तो इतिहासांत सुवर्ण अक्षरांनी कोरल्या गेलेला आहे. याच महिन्याच्या १५ तारखेला भारत स्वतंत्र्य झाला. १५० वर्षां पासून ब्रिटीश राज्यसत्तेने आम्हाभोंवती गुलामगिरीच्या ज्या अजस्त्र शृंखला जखडल्या होत्या त्या तोडून ४० कोटि लोकसंख्येचे हे राष्ट्र १९४७ साली बन्धमुक्त झालें. १९५० साली स्वतःच्या स्वतंत्र अस्मितेने स्वतःच्या आधिपत्याखाली प्रगत वाटचाल केली आणि आज त्याच एकेकाळच्या गुलाम राष्ट्राने जगाचे डोळें दिपवून गौरवाचे स्थान पटकावलें.

परंतु अंधःकारमय जीवनांतील ही चकाकणारी सुवर्णमय रेखा पाहण्यासाठीं आम्हाला त्यागाची किती पराकाष्टा करावी लागली याचा इतिहासहि तितकाच हृदय विदारक व दग्ध आहे. मायभूमिला स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठीं तिच्या कित्येक सुपुत्रांना आपलें प्राण वेचावें लागलें. देशासाठीं हंसत हंसत तोफेच्या गोळ्यांशीं खेळावें लागलें. इतकेच नव्हें तर कित्येकांना आपल्या आयुष्याचें रंगी बेरंगी क्षण अंधार कोठडींतून वज्रांचे आघात साहून घालवावें लागलें. जीवनभर ब्रिटीशांच्या राज्य सत्तेचा सासुरवाशीण तत जांच सोसावा लागला. धन्य धन्य हे महान देश अन् धन्य त्या देशाच्या महान सुपुत्रांनो! असा ज्या देशाचा उज्वल इतिहास आहे तो देश महानच म्हणावा लागेल. त्याच्या या मौल्यवान रत्नांमुळेंच आजचे हे गोड स्वप्न पाहूं शकलो. पण काल जे घडलें त्याचेच हे आज फळास आलेलें कल्पवृक्ष आहे. अशा या भारत मातेच्या लेकरांचे आजच्या महिन्याला पुण्यस्मरण करणें आवश्यक आहे.

आज आपल्या राष्ट्रावर संकट आले असतांना या पावन स्मृतींची आठवण करणें तर महत्त्वाचें आहे. पिवळ्या नरकासुराने राष्ट्राला आव्हान दिलें आणि आपण ते आपल्या राष्ट्राची पुण्याई स्मरून स्वीकारलेंहि. आमच्या राष्ट्राचा इतिहासच मुळीं स्फूर्तिदायक आहे. स्वातंत्र्य संगरांतील एकेक स्मृति डोळयासमोर तरंगू लागल्या कीं रक्त गरम होते, बाहू स्फुरायला लागतात व प्रतिकाराची शक्ति अधिक दुणावते.

महाप्रयासाने मिळविलेलें आपलें स्वातंत्र्य आज धोक्यांत आहे......अशावेळीं आपल्या कर्तव्याची जाणीव १५ ऑगस्टला तरी होणे आवश्यक आहे. देशासाठीं प्राण वेचणारांचें स्मरण होणे आवश्यक आहे. ऑगस्ट महिना म्हणजे अनेक पावन स्मृतिंची आठवणच होय. आपणालाहि त्यांच्यासारखा त्याग करणें अगत्याचे आहे. ' शस्त्र घ्या हाती व्हा सिद्ध जरा ' आणि त्या पुण्यात्म्यांच्या स्मृतिस शतशः अभिवादन करा !

## महाराष्ट्र सरकारची चार कोटि 'वृक्षरोपणाची मोहीम'

**जिजामाता** पुण्यतिथी ते गांधी जयंती पर्यंतच्या या तीन महिन्याच्या समयावधींत संपूर्ण महाराष्ट्रांत चार कोटि झाडें लावण्याचा संकल्प महाराष्ट्र सरकारनें केला आहे. आणि त्याची प्रत्यक्ष मुहूर्तमेळसुद्धां १७ जूनला महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री श्री. मा. सां. कन्नमवार यांनी केली. शुभ स्थळ आणि शुभ स्पर्श यांचा एखाद्या संकल्पाला हातभार लागला कीं त्याची यशस्विता निश्चितपणाची असतेच. सरकारच्या 'वृक्षारोपण मोहिमें' बाबतीतहि असेच म्हणावें लागेल. ह्या मोहिमेचा शुभारंभ जिजामातेचें जन्मस्थान सिंदखेड-राजा येथें झाला, त्यांच्याच पुण्यतिथीचा शुभ दिवस लाभला. इतकेच नव्हें तर राज्याच्या कर्णधाराचा मंगल स्पर्शहि या वृक्षारोपण मोहिमेला झाला, तेव्हां या संकल्पाला आणि सिद्धीला भरघोस यश येईल, यांत शंकाच नाहीं.

परंतु जनतेच्या सक्रीय पाठिंब्याशिवाय संकल्प सिद्धीस जात नाहीं हें एक नागडं सत्य आहे. पण या योजनेला जनतेचा वाढता पाठिंबा मिळत आहे, हेंहि तेवढेंच उघड आहे. 'सामुहिक जनशक्ती ही हिमालयाएवढी महान आहे,' ही जर तेवढ्याच प्रमाणांत लाभली तर ही योजना आणखी व लवकर यशस्वी होईल हे निश्चित. खरं म्हणजे लोकांनीं या योजनेमागील आशय व हेतू काय तो ध्यानांत घ्यायला हवा. वृक्षारोपण मोहीम ही सुद्धां एक समाज कल्याण योजना असून तिचा मानवी जीवनाशीं अतिशय निगडीत व निकटचा संबंध आहे हे सर्वांत महत्त्वाचे.आपल्या नित्योपयोगी वस्तु भाजी–पाला, फळं, फुलं, लाकुड, इंधन इत्यादि सर्व वृक्षरुपीय देणग्या आहेत. त्यांचे मानवावर अनेक उपकार झालेलें आहेत. ते अकल्पितपणे मानवाची सेवा करीत असतात. वृक्ष म्हणजे अक्षय धन होय. झाड हा परमेश्वरानें दिलेला एक वर आहे. एवढेच नव्हे तर आजच्या आर्थिक जीवनांत त्यांचे महत्वाचे स्थान आहे. त्यांचे सांस्कृतिक महत्वहि मोलाचे आहे. तेव्हां ही वृक्षारोपणांची मोहीम यशस्वी करणें आपलें कर्तव्यच ठरते.

अनुक्रमणिका









देशाच्या भरभराटी करितां रेल्वेंना अति महत्वाचें काम करावयाचें आहे. देशाच्या रक्षणा करितां आज तर त्यांचे वर अधिकच जबाबदारी येऊन पडली आहे.





मध्य आणि पश्चिम रेल्वे

**भारताच्या संरक्षणासाठीं आपल्या रक्ताची, श्रमाची आणि धनाची ( सोन्याची ) अत्यन्त जरूरी आहे-तें अविलंब द्या**








सरकारने राज्याश्रयाखालीं हे समाज कल्याणाचे बहुमोल कार्य हाती घेतलें, याबद्दल सरकारचे अभिनंदन करणें आवश्यकच आहे. आवश्यक वनस्पतिचा, भाजी-पाल्याचा अभाव लक्षांत घेता सरकारची ही चार कोटि वृक्षारोपण करण्याची योजना स्तुत्य तर आहेच पण विशेष उल्लेखनीय आहे.!

## श्री. वसंतकुमार सराफ यांच्या संपादन कुशलतेचा गौरव

मराठी नियतकालिक व्यवसायांतील सर्व परिचित व वसुधा, ललना व शामसुंदर या तीनही मासिकांचे संपादक श्री. वसंतकुमार सराफ यांनीं 'वसुधा' मासिकाचा १५० वा गौरवांक प्रसिद्ध केला आहे. याबद्दल 'दीपावली' तर्फे आम्ही त्यांचे हार्दिक अभिनंदन करीत आहोत. मराठी मासिकांच्या संपादकीय परिवारांतील ते एक महत्वाचें घटक तर आहेतच पण विशेष उल्लेख करायचा म्हणजे 'दीपावली' चे जवळचें व जिव्हाळ्याचें स्नेही पण आहेत. त्यांच्या 'वसुधा' मासिकाला १२ वर्षे पूर्ण होऊन तिचा वाढदिवस गेल्या महिन्यांत १५० व्या अंकाच्या रूपानें साजरा झाला. त्यांच्या या आनंदसोहळ्याच्या वेळी तर त्यांचे अभिनंदन करणें अगत्याचेंच आहे.

ते आज तीन मासिकें अत्यंत नेटाने व जोखमीने चालवित आहेतच. तसेच त्यांनी नवलेखन प्रकाशन संस्थाही अत्यंत यशस्वीपणें चालविली आहे. मनापासून असलेल्या ज्ञानाच्या आदरामुळें व मराठी भाषेच्या आत्यंतिक प्रेमामुळेंच त्यांनी ही धडपड व सर्व प्रयत्नांची पराकाष्ठा केली. मराठी मासिक चालविणें हे तारेवरच्या कसरतीसारखें जोखमीचे आहे. जर कां चुकला तर तारेवरून घसरलाच म्हणून समजा. मनाच्या धांदलींतून लोकांच्या तीक्ष्ण नजरेंतून सुटून, सर्व लोकांची मर्जी सांभाळून जो आपली ही कसरत यशस्वी करतो तोच खरा यशस्वी संपादक! अगदीं असेच आमचें स्नेही श्री. वसंतकुमार सराफ यांचे बाबतींत ठामपणें म्हणता येईल.

श्री. सराफांनी 'वसुधा' मासिक सुरूं करून भरघोस यश संपादन केलें असेल पण जवळची बरीच माया घालविली हे पुष्कळांना माहित नसेल. वसुधेच्या सजावटीनें, स्वरूपानें आणि वाचकांना आवडणाऱ्या अंतरंगांने मराठी नियतकालिकांत मानाचें पान पटकावलें. नवें प्रयोग केले. आजच्या कांहीं प्रतितयश विनोदी लेखकांना प्रकाशांत आणलें.

पण कधी कधी सुखापोटीं दुःख जन्म घेते तसें श्री. सराफांच्या बाबतीतहि झालें. तरीहि सुखावर पूर्वीचेच झळकणारे हंसू खेळवींत आपला जिद्दीचा मार्ग साकारलाच. दुःखालाच रडवीत त्यांनी वसुधा पुढें नेली. इतकेंच नव्हे तर दुःखावर मात म्हणून प्रतिकुल वातावरणांतहि ललना, शामसुंदर सुरूं केले. याच्यासाठीं चिकाटी लागते. आत्मविश्वास अंगी असावा लागतो. तो श्री. सराफ यांच्यात भरपूर आहे. म्हणूनच ते आज मराठी मासिकांच्या चक्रव्यूहांत डळमळींत न होता जिद्दीच्या भरवशावर उभे आहेत. जखम झाली तरी मीठ चोळींत स्वतःच हंसताहेत. कांहीना त्याचे नवल वाटेल. पण हे सत्य आहे.

वसुधेच्या १५० व्या अंकाच्या रुपानें ते आपला आनंद व्यक्त करीत आहेत. आम्हीहि त्यांच्या आनंदांत सहभागी आहोत. पुनश्च एकवार मनःपूर्वक अभिनंदन!

●●●

---

...पान ५५ वरून

ticism) झुकत आहे याच्या खुणा या काव्यसंग्रहांत स्पष्टपणें उमटलेल्या आढळतात हें मुद्दाम नमूद करावेसे वाटतें.

— श्रीपाद भागवत

[ स्वप्नजाः—कवियित्री—पद्मा गोळे, प्रकाशकः—मौज प्रकाशन; किंमत ४ रु. ]

### भावनांचें विश्व

—श्री रमेश पाटील यांनीं लिहिलेल्या चार एकांकिकांचा हा संग्रह आहे. आचार्य प्र. के. अत्रे यांचा या लेखकाने आशीर्वाद घेतला आहे. आशीर्वादांत आचार्य अत्र्यांनी म्हटल्याप्रमाणें लेखकानें संवाद आणि नाट्य यांचें तंत्र बऱ्यापैकीं आत्मसात केलें आहे. परंतु लेखकाचा नाट्यरूप आशय अगदींच थिटा पडतो.

'भावनांचें विश्व' हीच नाटिका घ्या. विमान अपघातात प्रियकर कोसळून ठार झाल्यामुळें मनावर परिणाम होऊन पंतांच्या सुषमाला वेड लागतें, हा या नाटिकेचा विषय. कितीतरी चित्रपट, कादंबऱ्या, आणि कथा यांनीं हा विषय चावून बोथट केला आहे. त्यांतही नाटककाराला सुषमाच्या मनावर झालेला आघात हळुवारपणें दाखवता आला असता आणि त्याचा क्रमशः विकास दाखवून त्यांत खरं 'भावनांचें विश्व' निर्माण करणं अशक्य नव्हतं. पण Flash back च्या तंत्रासाठीं अगोदर सुषमाचे वेडेविद्रे चाळे, ओरडा आरडा दाखवून नंतर तिची हकीगत पंतांच्या तोंडून ऐकविण्यामुळें पुढील सर्व भाग म्हणजे पंतकथित खंत कथा झाली आहे. त्यांत नाट्य रहातच नाहीं. तो साधा संवाद होतो.

'शिकार' ही नाटिका विवाहमंडळांच्या कारभारावर प्रकाश टाकणारी आहे. तिचें स्वरूप प्रहसनात्मक आहे. यांतील विषय देखील जुनाच आहे. पण तरीहि हिची रंगत चांगली जमली आहे. पण हिचा दोष असा कीं हिला रंगभूमि मूल्य (Srage value) नाहीं कारण पहिले दोन-चार प्रयोग झाल्यावरही हिच्यांत चिरंतन आकर्षण राहील असें या नाटिकेंत कांहींहि नाहीं.

आयुष्यांतल्या भरल्या संसारपटांतून अर्ध्यावरच काळानें खेचून नेलेल्या व्यक्तीची इच्छा अतृप्त राहतें. मग तो आत्मा पुन्हा आपल्या प्रिय व्यक्तीच्या भेटीस येतो या कल्पनेवर आधारलेली नाटिका म्हणजे हांक! महेशाची हांक स्वर्गस्थ नीलमला पोंचतें व ती येते ही कल्पना पूर्वीच्या ऋणानुबंधांच्या कोरड्या उजळणीखेरीज यांत कांहीं नाहीं.

अखेरची नाटिका 'जावे त्याच्या वंशा' ही मात्र खरोखरच इतरांच्या मानानें सरस आहे. रंगमंचावर प्रवेश करण्यापूर्वी 'पडद्याआड केवढी विलक्षण उलथापालथ होत असते' याचे मार्मिक व वेधक चित्रण यांत आहे.

नुसती मोलाचा फ्रेम असून भागत नाहीं. त्या फ्रेममध्यें बसवायचें छायाचित्र देखील तितक्याच तोलाचें असावें लागतें. एवढें जरी नाटककारानें लक्षांत घेतलें. तरी त्यांच्या लेखनांत स्वागतार्ह बदल होऊं शकेल.

—श्रीपाद भागवत

**भावनांचें विश्वः**—ले.:—रमेश पाटील, विद्या प्रकाशन, बुलढाणा; किं. रु. १–७५ न. पै.

●●●






